शारदाश्रम ग्रंथमाला. क्रमांक ७

कवीश्वर भास्करभट्ट महानुभावकृत

# उद्धवगीता

अथवा

## ( एकादशस्कंध )

प्रस्तावना, पाठभेद, अर्थनिर्णायक टिपणी, विस्तृत शब्दकोश
व सूची यांसहित

संपादक

**विष्णु भिकाजी कोलते**

एम्. ए. ( मराठा ); एल्एल् बी; ( नाग. )

एन्. के. बेहेरे गोल्ड मेडॅलिस्ट; खानब. एच्. एम्. मलिक गोल्ड मेडॅलिस्ट

मराठीचे अध्यापक किंग एडवर्ड कॉलेज

अमरावती

१९३५

किंमत २ रुपये

# अनुक्रमणिका

## शारदाश्रमातर्फे पुरस्कार

भास्कर कवीश्वरकृत ओवीबद्ध प्राचीन मराठी ग्रन्थ 'उद्धवगीता' हा सटीप प्रसिद्ध होत आहे. प्रो. विष्णु भिकाजी कोलते एम्. ए; एल्एल्. बी; हे प्राचीन मराठी वाङ्मयाचे, आणि विशेषतः महानुभावीय मराठी वाङ्मयाचे एक विचिकित्सक अभ्यासी आहेत. प्रस्तुत ग्रन्थ शास्त्रीय पद्धतीनें संपादन करण्याच्या कामीं श्री. कोलते यांनीं किती परिश्रम केले हें ग्रन्थाच्या परिशीलनानें कळून येईल. शारदाश्रमांत संग्रहीत केलेल्या हस्तलिखित ग्रन्थांचा आणि इतरत्रही मिळविता येण्यासारख्या हस्तलिखित ग्रन्थांचा त्यांनीं संपादन प्रसंगीं उपयोग केला आहे. प्राचीन मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांना प्रो. कोलते यांनीं संपादिलेला ग्रन्थ फार उपयुक्त होईल अशी उमेद आहे. हा ग्रन्थ शारदाश्रममालेचा पुरस्कृत ग्रन्थ म्हणून प्रकाशित करावयास शारदाश्रम संस्थेच्या कार्यकारी मंडळास आनंद होत आहे.

शारदाश्रम, यवतमाळ<br>
ता. ८-१-३५ } यशवंत खुशाल देशपांडे

# शुभाशीर्वाद

---

श्री. प्रो. कोलते यांनीं संपादिलेली उद्धवगीता आम्हीं साद्यन्त वाचून पाहिली. ही अथपासून इतिपर्यंत, खरोखरच, नांवाजण्यासारखी उतरली आहे. प्रोफेसर मजकुरांच्या संशोधनबुद्धीची, मार्मिक विवेचनपद्धतीची व विवेचकत्सक दृष्टीची उत्कृष्टता त्यांनीं गेल्यावर्षी विविधज्ञानविस्तारांतून प्रसिद्ध केलेल्या 'शिशुपालवध' काव्यावरील परीक्षणात्मक लेखावरूनच आमच्या प्रत्ययास आली होती. हे लेख वाचीत असतां आमची मनोदेवता आम्हांस सांगत असे कीं, कांहीं दिवसांनीं प्रो० कोलते यांची उत्साहपूर्ण गंभीर लेखणी महानुभावीय वाङ्मयासंबंधानें चांगलाच अधिकार प्राप्त करून घेईल. त्याच गोष्टीचें प्रत्यंतर आज उद्धवगीतारूपानें पाहावयास मिळाल्यामुळें आम्हांस अत्यंतानन्द होत आहे. एका दृष्टीनें आमच्याच आरोपित बीजाचा वृक्ष फलित झालेला पाहून आम्हांस मोठा अभिमानहि वाटत आहे. कारण, आमच्याच प्रेरणेनें कै० वि० ल० भावे यांनीं 'शिशुपालवध' हें काव्य प्रकाशित केलें, व त्यांतील काव्यगुणांमुळें विश्वविद्यालयांनीं तें एम्. ए. परीक्षेला नियत केलें. एम्. ए. च्या वर्गांत असतां प्रो. कोलत्यांना त्याचा अभ्यास करण्याचा प्रसंग आला. त्यांच्या रसिक प्रतिभेला तें अतिशय आवडल्यामुळें त्यांच्या हृदयांत भास्कर कवीच्या इतर काव्यांचाहि रसास्वाद घेण्याची लालसा व महानुभावीय वाङ्मयासंबंधानें आस्था उत्पन्न झाली. त्याच लालसेचें व आस्थेचें दृश्य फळ म्हणजे ही उद्धवगीता होय.

प्रस्तुत ग्रंथावरून प्रो. कोलते यांच्या अंगीं वसत असलेलें मराठी भाषेचा उत्कट प्रेम, सूक्ष्म संशोधन दृष्टी, उद्योगशीलता, दृढव्यासंग इत्यादि अनेक गुण दृष्टोत्पत्तीस येतात. प्रो. मजकुरांनीं आधिकृत रीतीनें नवीन पद्धतीप्रमाणे दिलेले पाठभेद, विस्तृत टीपा, शब्दकोश हे सर्व यथाशास्त्र अभ्यास करणाऱ्या आधुनिक विद्वानांस फारच उद्बोधक वाटतील, अशी आशा आहे.

प्रो. साहेबांचा हा महानुभावीय वाङ्मय-संशोधनाचा उपक्रम अत्यंत स्तुत्य आहे. त्यांच्या उपक्रमानें महानुभावीय वाङ्मयावर चांगलाच प्रकाश पडेल असा भरंवसा वाटतो. त्यांचे भावी प्रयत्न यशस्वी होऊन फलरूप होवोत व श्रीचक्रधरस्वामी त्यांचा उत्साह द्विगुणित करोत असा आमचा त्यांना अंतःकरणापासून शुभाशीर्वाद आहे.

संस्थान श्रीदेवदेवेश्वर<br>माहूर<br>मार्गशीर्ष शु. १५ श. १८५५ } **महंत दत्तराज कवीश्वर महानुभाव.**

डॉ. पंजाबराव देशमुख

एम्.ए; डी.फिल्; बार. ॲट लॉ.

माजी शिक्षणमंत्री

यांस

कृतज्ञतापूर्वक

# उद्धवगीता

## प्रस्तावना



१ आतांपर्यंत प्रसिध्द झालेल्या महानुभावीय काव्यांचें संपादन जितक्या पध्दतशीर रीतीनें होणें अवश्य होतें तितकें तें दुर्दैवानें झालेलें नाहीं. कै. भावे यांनीं छापलेलीं 'शिशुपालवध ' व ' वच्छहरण ' हीं काव्यें तर अनेक ठिकाणीं मूळ पोथीला धरून नाहींत. पदच्छेदाचेही दोष त्यांत बरेच आढळतात. त्यामुळें अनेक ओव्यांचे अर्थ लावतांना अभ्यासकांना निष्कारण डोकेफोड करावी लागते. शिवाय भाषेच्या दृष्टीनें अभ्यास करणारे विद्वान त्यावरून चुकीचे सिद्धांत काढतात ते निराळेच. त्या दृष्टीनें रा. य. खु. देशपांडे यांनीं 'ऋद्धिपूर वर्णनाचें संपादन फार चांगलें केलेलें आहे. त्यांत चारपांच पोथ्यांतील पाठभेद जर त्यांनीं छापले असते तर भाषाशास्त्र-ज्ञाला तें पुस्तक अत्यंत उपयुक्त वाटलें असतें. प्रस्तुत 'उद्धवगीते' चें संपादन वरील दृष्टी समोर ठेवूनच करण्याचा मी प्रयत्न केला आहे. तो कितपत साधला हें अभ्यासकांनीं ठरवावें.

२ हें काव्य आज अगदीं पहिल्यानेंच छापलें जात आहे असें नाहीं. कै. भास्कर महानुभाव पुणेकर यांनीं शके १८३२ मध्यें याची एक आवृत्ति प्रसिद्ध केली होती. परंतु ती केवळ महानुभाव पंथीयासाठींच असल्यामुळें इतरांना असून नसल्या सारखीच होती. काव्य, भाषा, महानुभाव पंथाचें तत्त्वज्ञान इत्यादि दृष्टींनीं मला हें काव्य फार सरस व महत्त्वाचें वाटल्यामुळें तें योग्य रीतीनें संपादून प्रसिद्ध करावेसें वाटलं. या माझ्या इच्छेला रा. वामन नारायण देशपांडे व रा. य. खु. ऊर्फ आप्पासाहेब देशपांडे यांच्या सहानुभूतीची व मदतीची जोड मिळाल्यामुळें आज हें काव्य रसिकांच्या व अभ्यासकांच्या समोर मला सादर करतां येत आहे. प्रस्तुत आवृत्ति तयार करण्यासाठीं ज्या हस्तलिखितांचा मी उपयोग केला त्यांचा तपशील येणेंप्रमाणें :—

## मूळ प्रत

प्रस्तुत ग्रंथाच्या संपादनाला आरंभ करतांना उपलब्ध झालेल्या पोथ्यांपैकीं जींत उद्धवगीता अथपासून इतिपर्यंत सुवाच्य हस्ताक्षरांत लिहिलेली होती अशी एकच पोथी असल्यामुळें तीच मूळ म्हणून निश्चित करावी लागली. पोथीचा आकार ६"×३१/२" असून प्रत्येक पानावर साधारणतः ११ ओळी आहेत. लीप बाळबोध. उद्धवगीतेखेरीज दायंबाचा 'निर्वेद' व मुनिगंगाधरकृत ओवीबद्ध 'गीताटीका' हे दोन ग्रंथ पोथींत लिहिलेले आहेत. कोणत्याच ग्रंथाचा लेखनशक दिलेला नाहीं. तरी पोथी दोनशें वर्षांपूर्वींची असावी असें कागदावरून वाटतें पोथीच्या पहिल्याच पानावर देवगिरी येथील यादवांची वंशावळ दिलेली आहे. 'श' व 'स' आणि 'न' व 'ण' या अक्षरांमध्यें लेखकानें विशेष फरक ठेवलेला नाहीं ही गोष्ट सोडल्यास पोथी शुद्ध लिहिलेली आहे. त्यावरून नकलकार सुशिक्षित असावा असें वाटतें.

## श प्रत

आकार ५१/४"×३१/४" प्रत्येक पानावर ओळी सुमारें १२. उद्धवगीतेच्या आरंभीच्या १५७ ओव्यांचीं पानें नाहींत. १५८ पासून पुढील सर्व ग्रंथ सुवाच्य बालबोध लिपींत लिहिला आहे. उद्धवगीतेखेरीज दामोदर पंडिताचें 'वच्छहरण' संपूर्ण लिहिलेलें आहे. उद्धवगीतेचा समाप्ति लेख पुढील प्रमाणें आहे "शुभं भवतु लेखक पाठकयो ॥ स्वस्तिश्री शके ॥१४५७॥ मनमथ स्वत्सरेः वादि मार्गशिरे साणिवारे कृष्णपक्षे विजे ॥ आत्मकार्येर्थमिदं पुस्तकं लिषितंः एकादश ग्रंथः संपूर्णमीतीः लेखकयो ॥छ॥" दिवाण बहादूर पिल्ले यांच्या जंत्रीवरून पडताळून पाहतां या समाप्तिलेखांतील शक, पक्षतिथिवारांसुद्धां अगदीं बरोबर असल्याचें आढळून येतें.पोथींतील हस्ताक्षर वळणदार असलें तरी मधून मधून मात्रा देण्याच्या बाबतींत मात्र पोथीलेखकानें दुर्लक्ष केलेलें आहे. 'श' व 'स' आणि 'न' व 'ण' यामधें फरक मानलेला नाहीं. तत्कालीन भाषाप्रचारानुसार 'ख' साठीं 'ष' व 'ष' साठीं 'ख' बहुतेक सर्वत्र लिहिलेला आहे. 'ए' बद्दल 'य' व 'ज्ञ' ऐवजीं 'ग्न' ही सर्वत्र आढळतो.

ऱ्हस्वदीर्घांच्या बाबतींत या प्रतींतील एक विशेष मात्र विशेष लक्षांत ठेवण्यासारखा आहे. तो असा कीं इकारान्त व्यंजनांनीं आरंभिलेले बहुतेक सर्व शब्द साधारणपणें सर्वच ठिकाणीं दीर्घ लिहिले आहेत. वीकार, वीकल्प, नीऱ्हा मी इत्यादि शब्दांवरून वरील विधान लक्षांत येईल. पाठभेदांच्या दृष्टीनें मला ही पोथी फार महत्त्वाची वाटली. हिचीं सर्व पानें सुव्यवस्थित असतीं तर प्रस्तुत पुस्तकाच्या संपादनाच्या दृष्टीनें बराच फायदा झाला असता. पण त्याला इलाज नाहीं.

## ग प्रत

आतांपर्यंत उपलब्ध झालेल्या एकंदर पोथ्यामध्यें 'सकळ' लिपींत लिहिलेली ही बरीच जुनी पोथी आहे. श्री. य. खु. देशपांडे यांना ही एका महार गृहस्थाजवळून मिळाली हा तिचा विशेष होय. आकार ६"×३½." एका पानावर ओळी १३. आरंभीं उद्धवगीता लिहिलेली आहे. पण तिच्या पहिल्या २२ ओव्या तुटलेल्या आहेत. २३ व्या ओवीपासून पुढें सर्व पोथी चांगल्या स्थितींत आहे. उद्धवगीतेखेरीज वच्छहरण, दार्यबाकृत निर्वेद व गद्यराजस्तोत्र हीं काव्यें तींत आहेत. पोथीचा लेखनशक १४९८ असल्याचें पुढील समाप्ति लेखावरून समजतें. "शुभं भवतु लेखकपाठकयो वाचिता विजया हो ॥*॥ शके १४९८ द्धाता संवत्छरे पूशमासे वादिपक्षे तिथि दशमिते ते दीणी संपुर्ण मिति ॥" या समाप्तिलेखांत वार, नक्षत्र वगैरे कांहीं दिलेले नसल्यामुळें तो बरोबर आहे किंवा नाहीं हें ठरविण्यास मार्ग नाहीं. तथापि शक संवत्सर (धातृ अथवा धाता ऐवजीं लेखकानें द्धाता लिहिलें आहे एवढेंच ) यांचा मेळ बरोबर पडत असल्यामुळें लेखनकाल सामान्यतः बरोबर आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

लेखनाच्या दृष्टीनें या पोथींत एक दोन विशेष गोष्टी आहेत. पोथी सकळ लिपींत आहे हा एक व 'ए' ऐवजीं 'य' तसेंच 'य' साठीं 'ए' बहुतेक ठिकाणीं लिहिला आहे. क्वचित 'वो' च्या ठिकाणीं 'ॐ' लिहिलेला आढळतो. इतर दृष्टीनें पोथी शुद्ध आहे. कांहीं ठिकाणीं मात्र पानें चिकटलेलीं असल्यामुळें ओव्या पुसटलेल्या आहेत पण त्यामुळें वाचनाला विशेषसा त्रास होत नाहीं.

द प्रत.

प्रस्तुत आवृत्तीच्या संपादनाला उपयोगी पडलेली ही तिसरी महत्त्वाची पोथी होय. प्रत्येक पानाचा आकार ५½"×३½" असून त्यावर साधारणपणें १२ ओळी लिहिलेल्या आहेत. उद्धवगीता आरंभीं लिहिलेली आहे पण दुर्दैवानें याही प्रतींतील पहिल्या ३६४ ओव्यांचीं पानें काळाच्या भक्ष्यस्थानीं पडलीं आहेत. ३६५ व्या ओवीपासून उद्धवगीतेचा पुढील सर्व भाग, गद्यराजस्तोत्र व संस्कृत भगवद्गीता इतके ग्रंथ या पोथींत आहेत. हिचा समाप्तिलेख असाः—"शके १४९९ ईश्वरनाम संवत्सरे कार्त्तिकु शुद्ध दिपावळि चतुर्दशे गुरुवासरे बळेग्रामे संतात्मज सांतिनगरे परोपकारार्थ अवगत"—इ० यांतील शक तिथिवारासुद्धां बरोबर आहे. कार्त्तिक शु.१४ गुरुवारीं सूर्योदयानंतर ३३ घटकांनीं लागली एवढाच काय तो सूक्ष्म फरक आहे पण तो विशेष लक्षांत घेण्यासारखा नाहीं. पोथी सरळ बाळबोधींत लिहिलेली आहे.

'ख' साठीं 'ष' व 'ओ' ऐवजीं 'ॐ' सर्वत्र लिहिलेला आहे हा पोथीचा विशेष होय. 'नव्हे' हा शब्द सर्वत्र 'न्हवे' असा लिहिलेला आहे शिवाय या पोथीला महत्त्व असण्याचें कारण असें कीं हिच्यांतील कांहीं भागांत लेखकानें पृष्ठमात्रेचा अवलंब केल्याचें दिसून येतें. उपलब्ध महानुभावीय पोथ्यांत पृष्ठमात्रेची अशी ही एवढीच एक पोथी आढळांत आली. अक्षर वळणदार व सुवाच्य आहे.

क प्रत

वरील सर्व पोथ्यांत—मूळ प्रतींत खेरीजकरून—उद्धवगीतेच्या आरंभींच्या कांही ओव्या फाटलेल्या असल्यामुळें, त्यांचे पाठभेद तयार करण्यासाठीं कोणती तरी एखादी संपूर्ण प्रत उपयोगांत आणणें जरूर होते. म. श्रीतळेगांवकर महानुभाव यांच्या जवळून अशी एक पोथी मला मिळाली तीच ही क प्रत होय. पोथींत लेखनशक दिलेला नाहीं तरी ती शेसव्वाशें वर्षांपूर्वीची असावी असें वाटतें. आकार ५¾"×३½" असून प्रत्येक पानावर साधारणतः १२ ओळी आहेत. उद्धवगीता आरंभीं पूर्ण लिहिली असून

शिवाय नागराजकृत 'प्रतिष्ठान माहात्म्य' व नरेंद्राचें ८८७ ओव्यांचें रुक्मिणी–स्वयंवर आणि कांहीं आरत्याही आहेत. सर्व पोथी सकळ लिपींतच आहे. प्रस्तुत पोथींत लेखनशक दिलेला नसल्यानें व इतर प्रतींहून ती फारशी भिन्न नसल्यामुळें, हिचा उपयोग फार थोडा म्हणजे १६८ ओव्यांपर्यंतच केला आहे.

वरील पांच पोथ्यांच्या साह्यानें उद्धवगीतेची प्रस्तुत आवृत्ति पाठ-भेदांसहित तयार केली आहे. मूळ व पाठांतरें बहुश: पोथीबरहुकूम दिलेलीं आहेत. क्वचित **लण** मध्यें व **सश** मध्यें, ओवींतील यमकाला जुळेल व इतरत्र आलेल्या त्याच शब्दाच्या प्रयोगाला पचेल असा फरक करावा लागला. पण त्यामुळें पोथींतील भाषेला यत्किंचितही ढळ पोंचलेला नाहीं अशी खात्री मी देऊं शकतों. त्याच प्रकारचीं पाठांतरें जेव्हां वारंवार येऊं लागलीं तेव्हां शेवटीं शेवटीं तीं दिलेलीं नाहींत. पण अशा कांहीं महत्त्वाच्या विशेषांचा उल्लेख वर केलेलाच आहे.

३ टिपणी लिहितांना साती ग्रंथावरील दुसऱ्या व तिसऱ्या शोधनी टीपाचा फार उपयोग झाला. टिपणी स्वतंत्र रीतीनें वाचल्यास कदाचित् वाच-कांस अर्थबोध होणार नाहीं. त्यासाठीं मूळ समोर ठेवूनच ती वाचण्याचा प्रयत्न करावा. त्यांतही अन्वयार्थाच्या दृष्टीनें जेथें अडेल असें मला वाटलें तेथेंच टीपा दिलेल्या आहेत. कित्येक ठिकाणीं प्रचलित अर्थापेक्षां सांप्रदा-यिक म्हणून जे विशेष अर्थ टीपांत आढळले ते टीपकाराच्या ( तिसऱ्या शोधनीच्या ) शब्दांतच दिलेले आहेत. मी दिलेले अर्थ बरोबर आहेतच असा माझा आग्रह नाहीं. दिलेल्या अर्थापेक्षां अधिक सुंदर व योग्य अर्थ अभ्यासूंना लागल्यास ठीकच. अर्थाच्या दृष्टीनें विचार करावयास चालना मात्र टिपणीपासून अवश्य मिळेल. टिपणी छापून झाल्यावर मला स्वत:लाच घाडी=हल्ला (४३४); फोडी=सुपारी; वीडी=विडा ( १३८ ) वडप=वृष्टि (२८०); रूपक=गायन (४६०) हेच अर्थ अधिक योग्य वाटू लागले या दृष्टीनें अभ्यासकांनीं त्या त्या ओव्यांचे अर्थ लावावे अशी विनंती आहे.

४ शब्दकोश व सूचि, केवळ याच नव्हे तर इतर (महानुभावीय) काव्यांच्याही अभ्यासाला उपयोगी पडावी ही दृष्टी समोर ठेवून तयार केल्याचें दिसून येईल. एक विशिष्ट शब्द याच काव्यांत कुठें कुठें आलेला आहे हें स्पष्ट नमूद केलें आहे. इतकेंच नव्हे तर महानुभावांच्या ऋद्धपूर-वर्णन, वच्छहरण, ज्ञानप्रबोध व शिशुपालवध या काव्यांत तो आलेला असल्यास कोठें आलेला आहे तेंही नमूद केलें आहे. अर्थात्‌ या इतर काव्यांतील सर्व स्थळांचा उल्लेख करणें शक्य नव्हतें. तसें केलें असतें तर सूची फार फुगली असती. क्वचित्‌ ज्ञानेश्वरींत झालेला त्या शब्दाचा उप-योगही दिग्दर्शित केला आहे. त्यामुळें जुन्या काव्यांचा व विशेषतः महानु-भावीय काव्यांचा अभ्यास करणारास या सूचीचा चांगला उपयोग होईल असें वाटतें. शब्दसूची प्रमाणें व्यक्तींच्या नांवांची व स्थळांच्या नांवांचीही सूचि दिली आहे.

५ प्रस्तुत ग्रंथाच्या संपादनकार्यासंबंधीं वर दिलेल्या स्पष्टीकरणात्मक माहिती व्यतिरिक्त महानुभावपंथ, त्याचें वाङ्मय, ग्रंथकर्त्याचें चरित्र, उद्धव-गीतेसंबंधीं सर्व दृष्टींनीं चिकित्सात्मक विवेचन इत्यादि अनेक विषयांवर चर्चा या प्रस्तावनेंत होणें अत्यवश्य होतें. पण ती लिहून तयार असूनही या ठिकाणीं देण्याचें मी जाणूनबुजून रहित केलें. या काव्याच्या लेखकासंबंधीं 'भास्कराचार्य महानुभाव (चरित्र व काव्यविवेचन)' या नांवाचा स्वतंत्र ग्रंथच मी लौकर प्रसिद्ध करणार आहे. त्यांत, वर आवश्यक म्हणून निर्दे-शिलेल्या सर्व प्रश्नांवर सविस्तर चर्चा अंतर्भूत झालेली असल्यामुळें ती या ठिकाणीं मुद्दाम दिलेली नाहीं. शिवाय त्यामुळें या पुस्तकाचा मजकूर पन्नास साठ पानांनीं तरी खात्रीनें अधिक वाढला असता व मग अर्थातच पुस्तक आतांच्या किंमतींत वाचकांच्या हातीं देणें अशक्य झालें असतें. तथापि अभ्यासाच्या दृष्टीनें कविचारित्रासंबंधीं माहिती असणें फार जरूरीचें असल्यामुळें विविधज्ञान-विस्तारांत (इ. स. १९३२. ऑगस्ट, ऑक्टो. नोव्हे. व डिसेंबर.) 'शिशुपालवध' या शीर्षकाखालीं प्रसिद्ध झालेल्या माझ्या लेखमालेचा उपयोग करून घेण्याची मी वाचकांना विनंती करितों. रा. वा. ना. देशपांडे यांनीं

लिहिलेला 'शिशुपालवधकर्ता भास्करभट्ट बोरीकर' (वि.शा.वि. आक्टो.१९२८) हा लेखहि अवश्य वाचावा, म्हणजे अभ्यासाला उपयोगी होईल इतकी माहिती सहज मिळेल.

६ शेवटचें कार्य आभार लेखनाचें. तेवढें करून ही प्रस्तावना संपवितों. शारदाश्रमाचे उत्पादक व संचालक इतकेंच नव्हे तर सर्वस्व असलेले प्रसिद्ध संशोधक श्री. य. खु. ऊर्फ आप्पासाहेब देशपांडे आणि माझे सन्मित्र श्री. वा. ना. देशपांडे यांच्या मदतीशिवाय व सहानुभूतीशिवाय प्रस्तुत काव्यांचें संपादन माझ्याकडून होणें अशक्य झालें असतें. शारदाश्रमांतील पोथ्या व इतर हस्तलिखितें देऊन व वेळोवेळीं महत्त्वाच्या सूचना करून आप्पासाहेबांनीं मला कायमचें ऋणी करून ठेवलें आहे. मध्यप्रांत सरकारचे माजी शिक्षणमंत्री डॉ. पंजाबराव शामराव देशमुख यांच्या संबंधीच्या माझ्या भावना लिहून दाखविण्यापेक्षां मौनानेंच अधिक व्यक्त होतील असें वाटतें. ऋद्धपूर येथील महात्मे म. श्रीगोपीराज महानुभाव व ई. कृष्णराजदादा लासूरकर महानुभाव यांच्या साह्याशिवाय तर टिपणींचें सदर हल्लींच्या स्वरूपांत वाचकांच्या समोर येऊंच शकलें नसतें. म्हणून वरील सज्जनांबरोबर त्यांचे व इतर अनेक दृष्टींनीं उपयोगी पडलेले श्रीदत्तलक्षराज महानुभाव (माहूर), श्रीयक्षदेव महानुभाव (रितपूर), पंडित बाळकृष्ण शास्त्री, श्री. नेने, श्री. कुरकुरे इत्यादिकांचेही मी अंतःकरणपूर्वक आभार मानतों.

## ग्रंथांत वापरलेल्या संक्षेपांची सूचि

| | |
|---|---|
| अमृ. | अमृतानुभव |
| अ.रा. | अध्यात्म रामायण |
| एभा. | एकनाथी भागवत |
| कुमार. | कुमार संभव |
| ऋ. | ऋद्धपुर वर्णन |
| केका. | केकावली |
| ना. स्मृ. | श्रीनागदेवाचार्य स्मृति |
| भा. / भाग | भागवत. एकादशस्कंध ( संस्कृत ) |
| भा. ना. | भारतीय नाट्यशास्त्र (कु. गोदूबाई केतकर) |
| मू. प्र. | मूर्तिप्रकाश |
| रुस्व. | रुक्मिणी स्वयंवर (एकनाथ) |
| वच्छ. | वच्छहरण |
| वि. क. | विष्णु कवीची कविता |
| शि. | शिशुपालवध |
| श्रीसिसू. | श्रीचक्रधर सिद्धांतसूत्रें ( श्री. नेने भवाळकर ) |
| ज्ञा. / ज्ञाने. | ज्ञानेश्वरी |
| ज्ञाप्र. | ज्ञानप्रबोध |
| क. / ख. / म. / द. | संपादनासाठीं वापरलेलीं हस्तलिखितें. प्रस्तावना पहा. |

# उद्धवगीता

श्रीकृष्णाय नमः

१

श्रीमच्चक्रधरास्यनिश्रृतवचःपीयूषपूर्णप्रपा–
पाथोदः पथि पांथमंथरपरिश्रांतस्य लोकस्य यः ।
स्फूर्जद्भीमभवाटवीं समटतस्तं नागदेवं सदा
सरासारविचारसुंदरगिरापारंगतं नौम्यहम् ॥१॥

२

श्रीदत्तात्रय प्रभूचें नमन

सैह्याचळाचिये चुळुकें : जयाचें प्रभामंडळ फांके
तो श्रीदत्तु ललाट-फळकें[1] : नमस्करीतु[2] असें १

३

श्रीकृष्ण चक्रवर्तीचें नमन

नमीनं[3] यादवतिलकु[4] : जो कैवल्यलताकुसुमस्तबकु
उदैला आनंदमृगांकु : मोहां अंधकारीं[5] २

१ क. ललाटपळकें. २ क. नमस्करितु. ३ क. नमिन.
४ क. यादवकुळटीळकु. ५ क. मोहांधकारीं.

## ४

### श्रीचक्रधरांचें अभिवंदन

चैतन्याचिये आळां : कैवल्यद्रुमु कोंभैला
तो चांपेगौरु[१] अभिवंदिला : श्रीचक्रधरु ३

## ५

### आचार्यांचें नमन आणि स्तवन

पडिलेयां[२] संसाराची अडणी : जो पुरवी ब्रह्मविद्येची तवनी
तो आचार्यां शिरोमणि : नमीन[३] नागार्जुनु ४

जो विवेकाचा सारथी : वैराग्याचा बाळारथी
आघाओ कैवल्यपथीं : जीवजातासी[४] ५

## ६

### निमित्याचा उपयोग आन ग्रंथकर्तेयाची रंकवृत्ति

तया नागार्जुनाचा उपदेशु : म्हणौनि बोलावेया[५] शांतिरसु
भास्करु कवि जाला सौरसु : वोवि प्रबंधीं ६

चैतन्याचिये खोल वाटे : पांतां[६] वेदांचि धाव कुंठे
तें श्रीकृष्णरूप नेटेंबोटें : कवण वर्णु जाणे ? ७

१क. चांपेगौर २क. पडिलयां संसाराचिये. ३क. नामिन. ४क. जिवजातांसी. ५क. बोलावया शांतरसु. ६क. पाहातां वेदांची धांव कुंटे.

पुन तें घननीळ सांवळें : परब्रह्म नेपाळें
वाणितां वेंचिजति फळें : मुक्तिलतेचीं[1] ८

वर्णितां यादवनरेंद्र : तियेंचा सीद्धे सारश्वतमंत्रु
म्हणौनि उचकौ[2] फणिंद्र : रची शद्बसागरातें ९

आतां श्रीकृष्णाचिया किर्तिचंद्रिका:विकासली उन्मेष[3] काळिका
तरि जानांची[4] मनोनासिका : सुपरिमळ करीन[5] १०

पुराणिचे दळवाडें : रसाळंकारें[6] साबडें
म्हणौनि भावो न निवडे : कळावेदांसि ११

## ७

रसिक ग्रंथ जालया आइक म्हणून वीनंती करावी नलगे

तया प्रमेयांची[7] वोडवन : वरि दोजें[8] साहित्याचें वोल्हावन
तरि कविता वशिकरण[9] : कवणासि नव्हे ? १२

वर्णितां यदुपती[10] : बोलीं सहज वेधवंती[11]
म्हणौनि श्रोतयां[12] विनती : सुआवी न लगे १३

काई भवरांसि कमळीं : कांहीं मानिलें असें हाता तळीं ?
किं कोकिळां[13] रसाळीं : नेसों दीधलें[14] ? १४

१ क. मुक्त लतेचीं. २ क. उचकाना. ३ क. उन्मेख.
४ क. जनाचेयां. ५क.करिन. ६क. रसाळंकार. ७ क. प्रमयांची.
८ क. दिजे. ९ क. वैस्यकरण. १० क. येदुपती. ११ क. वेधवंती.
१२ क. श्रोतयां. १३ क. कोकिळीं. १४ क. दिधलें.

नां तरि मेघमंडळें : काई चातक लांचाविलें ?
किं चंद्रें मुळ पाठविलें : चकोरांसि ? १५
म्हणौनि प्रबंधु होइल रसिकु : तरि आइकैल श्रोतेयांचा देशकु
तऱ्हीं ते आईकतु बोलु एकु : विज्ञापेनाचा[1] १६

८

श्रोता जाणता असिला तरि बोलतेयासि स्फूर्ति होये.

भेटति द्रावक गोटे : तरि लोहासि झरा फुटे
सोमकांता गळति थेंबटें : चंद्रकेरां[2] तव १७
नां तरि देखौनि रविमंडळ : त्रिकोशे[3] कमळांचें बांबळ
कोंभेजे केतकी-जौळें[4] : मेघींकरूनि १८
तैसा सुवर्म[5] जोडे श्रोता . तरि रसभावीं फुले कविता
तोंवरु[6] ये सारस्वता : नव रसांचे १९
सामर्थ्याची[7] अणी : रोउनि वोविजे[8] मुक्तामणि
तरि चक्रवर्तिचां कंठभुषणीं : योग्य होये[9] २०
तैसा जानाचिया सभा : शोधिजे शब्दरत्नाचा गाभा
तै मीरवे अळंकार शोभा : कविता—वधुसि २१

१ क. विज्ञानपणाचा. २ क. चंद्रकरास्तव. ३ क. विकासे. ४ क. दळ. ५ क. स्वर्मू. ६ क. तोवर. ७ क. सामतयाची. ८ क. ओंबिजे. ९ क. होए.

## ९

### कथामहत्त्व

तियें[1] कवितेची गोडी : कोकिळांची तराय मोडी
गीतसाळ करी कुडी : किन्नरांची २२
आपुलां कळरवीं : कविता कळहंसातें पढवी
ते रंगमाधुर्य सीखवी[2] : मधुकरांतें २३
आंगिचिया सौरम्यकळा : उणें आणी परिमळा
गांभीर्यें करी अवकळा : गगनगंगेसि २४
रतीचीये भूलेतेसीं[3] : त्यें[4] चातुर्यें कासी[5]
पडप दे संध्या—वधुसि : अंगरागाचें २५
पदप्रमेयाचें[6] गुंफणें : स्यांमा[7] भुजबंधातें जिणे
कोवळीक घाली सीरणें[8] : शिरीष पुष्पांसी २६
निच निच तारागणा : दीजैलें[9] संध्यारागाचें रावण
तर्‍हीं आखरांचें सुरंगपण : अधिक दीसे[10] २७
पदांचा मेळावा : रत्नाकरा करी चढावा
प्रमय करी हेवा : अमृत—लेहरीसीं[11] २८

१ क. तीये. २ क. ग. सीकवी. ३ क. भुलेतेसी. ग. भ्रूलतेसी.
४ क. तेथ. ग. ते. ५ क. काइसी. ६ क प्रमयां. ग. प्रमेयांचें.
७ क. श्याम. ग. श्यामा. ८ क. सिर. ग. सीर. ९ क. ग. दिजे.
१० क. दिसे. ११ क. लहरीयेसीं.

आंतु चंद्रकरां : झळाळु दीसे सुधाकरां
तैसे पदांचेया पदरां : भीतरि[1] भाव डोळां दीसति २९

पिळिलेयां चद्रबिंब : सुटति अमृतधारांचे कदंब
तैसे फुटति तुंब : नव–रसांचे ३०

ऐसिये[2] कविता–लते : ब्रह्मविद्येचीं फुलें दिसति[3] फांकतें
तरि पसरतेनि[4] हातें : कवण न तोडी ? ३१

पवित्रा गंगोदका : सरिसी परतिजे[5] कस्तुरिका
तरि परिमळाचेया कवतिका : कां न लवावि[6] ? ३२

कापुरकेळीचां[7] पदरीं : दिसति तुळसिचेया[8] मंजिरी
तरि तोडुनि कबरभारीं : कवण न बंधे ? ३३

ब्रह्मविद्येचेनि कसें : कामतत्त्वा भांजनी[9] दीसे
तरि कवणाचें मन आपैसें : अभिळाषु[10] न करी ? ३४

तैसें साहित्याचां राहाणी : शांतिरसा[11] अवतरण आणी
तरि माझी पवित्र वाणि : कवण नोईके[12] ? ३५

१ क. ग. भितरी. २ ग. ऐसीए. ३ ग. दीसती. ४ क. पसरतेन. ५ क. ग. प्रतिजे. ६ क. ग. लवावी. ७ क. कापूरकेळिचा. ग. कापुरू. केळिषा. ८ क. ग. तुळसिचिया मंजरी. ९ ग. भांजनी. १० ग. अभिळाश. ११ क. शांतरसा. १२ क. नायके.

## १०

### प्रबंधकरणीं ग्रंथकर्तेयाची रंकवृत्ति

पुराण—गगनिचा कुमुद[1]बंधु : जो आईकिजे येकादश स्कंदु[2]
तेथ कीजैल प्रबंधु : मुनीजनालागि ३६

जो कैवल्यकुसुमाचा आमोदु : नां तरि ब्रह्मविद्येचा युवन[3]मंदु
तो म्हणिपैळ[4] संवादु : श्रीकृष्णोद्धवाचा ३७

जेथ सर्वज्ञराओ निरूपिता : उद्धवदेवासारिखा श्रोता
तेथ पसरें कीजे कविता : ऐसी हाव कवणासि बांधवे ? ३८

मज नाहीं प्रमयांचा[6] सौरसु : वरि अज्ञानाचा डोळेलांसु
तया केवि आंतुडे मोसु : तयां निरूपणाचा ? ३९

पुन तेणें आखरें एकें : येवंढि संसार वागुर चुके
म्हणौनि श्रीकृष्णनिरूपणी कवतुकें : प्रबंधु करीतु असें ४०

## ११

### कर्मिक आन दैव रहाटीचीं सुखें ईश्वर सन्निधान सामर्थ्यें सुखें सदेवें जालीं भणौनि सुकार्या आलीं.

तेथ दशम स्कंदेसीं : कथा संगति ऐसी
उठखळें[11] करूनि दैत्यांसि : देवो[12] द्वारके राज्य करिति ४१

१ ग. कुमोद. २ क. स्कंधु ३ क. योवन. ४ क ग. जैल. ५ ग. आणि ६ क. ग. प्रेमाचा. ७ ग. तेया. ८ क. अक्षरें . ग. अखरें. ९ क. एवढी. ग एवडी. १० क. ग. कवतिकें. ११ क ग. उठकळें. १२ क ग. देओ

तेयां[1] यदुरायांचिये राणिवे[2] : सुखें[3] जाली सदैवें
पंडप जोडे निच नवें : अष्टभोगांसि[4] ४२

तै मुक्तीसि सौभाग्य आलें : ब्रह्मवांचे दैव उदैलें
चांग मगण वाढिनलें : शांतीचें पैं[5] ४३

विवेका तराय[6] जाली : प्रबोधा दशा उदैली
नवल जिनि जाली : वैराग्यासि ४४

आनंदा पाँटु[7] जाला : ध्यानाचा मानु वाढिनला
निकी उजळली कळा : धर्मजातांची ४५

तपासि बीर्क[8] चढलें : अध्यात्म चांग पदासि आलें
भांडवल जोडलें : उपनिषेदांसि[9] ४६

वेधां बाहोळि[10] जाली : विज्ञानें भली थोरावली
भक्तीसि राणिवें[11] जाली : योगमंडळिची[12] ४७

ऐसी राणीव भली : करूं जाणे तो वनमाळी
जया सर्व सुखाची दीवाळी : जाली चराचरासि ४८

ब्रह्मवीद्येचें निधान : तें देउनि सान्निधान
तोडिलें भव-बंधन : तेणें श्रीकृष्णरायें[13] ४९

१ ग. तया. २ क. एदुरायाचिए राणीवें. ग. °चीए राणीवे. ३ क. ग. सुखीयें. ४ क. भोगांसीं. ५ ग. तै. ६ क. तराए. ग. तराये. ७ क. पाडु. ८ क. बिक. ९. ग. उपनिखदांसी. १० क. बाहाळी. ११ क. राणीव. १२ क. मंडळीची. १३ ग. °राए.

## १२

एकीं सन्निधान जोडलें. तया सन्निधानीं ज्ञान देउनि
भवबंध छेदुनि मोक्षासि पाठविलें

तया[1] सान्निधानाची बेडी : जयां[2] न्हेचि[3] वरिपडी
ते केवि पावति पैलथडी : संसार-सागराची ? ५०
तेव्हळि किर्तिचें[4] करूनि तारूं : गुरु केला कर्णाधारू[5]
मग जिवां देखिला निस्तारू : भवार्णवांतु[6] ५१

## १३

परमेश्वर निजधामा बीजें करावयाची वृत्ति. आन पुढिल वेव्हाणि

ऐसें मोक्षाचें करूनि आचारूं : कृतकार्यों[7] जाला इश्वरू
मग निजधामा मेलिकारू : चिंतिता जाला ५२
माघौतें सीहावलोकनें : पाहिलें दैत्यसूदनें
तव यदुवंशाचीं वेळुवनें : वनवावीं असति ५३
तेव्हळि[8] ब्राह्मणाचेनि शापानळें : यादव-वन वनविलें
मग नेणतयाचेया ऐसें बोलिलें : सभेमांजि[9] ५४
" येथ[10] उपाओ[11] नाहीं ऐसा : जेणें चुके ब्राह्मणाचा शापु धारसा
म्हणौनि जाईजैल प्रभासा : आवघां[12] जनीं ५५

१ग. तेया २ग. जेया ३ग. न्हवेचि ४ग. कीर्तिचें ५क. करुणा-आधारू. ६ ग. भवार्णवा आंतु. ७ ग. कृतकार्यू. ८ क. तेव्होळिं. ९ क. ग. माझि, १०क एथ ११क ग. उपावो १२ क. अवघां.

तेथ तुम्हां पुण्य घडे : तरि चुकति आवघे[1]चि अवघडे
तेथचें फळ दाविजैलें[2] रोकडें : ह्यातावारि " ५६

ऐसें बोलौनि गोपाळें : यादवां करवि पालानविलें[3]
मग देव्हार चौकिये बीजें केलें : उद्धवदेवेंसीं ५७

## १४

### उद्धवदेवी देवाची वृत्ति जाणितली

तेथ म्हणे उद्धवदेवो[4] : "जि[5] ! हें आवघेचि वा[6]ओ
देवाचा बोलता भाँओ : कव्हणा वोळखवेना ५८

काईसें ब्राह्मणु? काईसा शापु? : हा आवघा तवंचि आटोपु
जवं तुं न करीसि कोपु : या ब्रह्मकुळावरि ५९

तुं दृष्टि करीसि वांकुडी : तरि येतढीये सृष्टिची होये रांखोंडी
तेथ ब्राह्मणाची काइसी प्रौढि : तुजपुढें? ६०

पुण तुजचि हे ईच्छा जाली : जें येदुवंशवेलिचां मुळीं
घालावी ईगळी : ब्रह्मशापाची ६१

चौतोंडा ब्राह्मणु आला : तो नेणों काई ओंळोंचुनि[12] गेला
तेह्ळिंचि[13] मि[14] धाकिनलां : मनामाँ[15]जि ६२

१ क. अपघेचि. २क. दाखविजैल. ३ क ग. पालानवीलें ४ग. देउ॰
५ ग. जी. ६ क ग. वावो. ७ क ग. भावो. ८ क ग. काइसा.
९ द्रिष्टि. १० ग. राखवंडी. क. राखोंडी. १२क. आळंचुनि.
१३क. तेव्हेळीसीचि. १४ क ग. मी. १५क. माझी.

जेथ काळा[1] वारिजति दारवठे : तिये[2] गांवीं काईसीं अरीष्टें ?
ये[3] ब्रह्मसुखाचिये पेंठे : उपताप काईसे ? ६३

पुन्‌ हें आवघें विचारितां : ऐसें येतें[4] असे माझेया चित्ता
जें गोसांवी निजधामा आतां : बिजें[5] करीति " ६४

## १५

उद्धवदेवीं जाणितली वृत्ति तीयेचें कार्ये उद्धवदेवाप्रति सांघितलें

तवं म्हणे श्रीचक्रपाणि : " ऑईकैं[6] भक्ताशिरोमणी !
माझि साभिप्राय वाणि[7] तुवां जाणितली ६५

ठाकौनि अंतराळीं : ब्रह्मेनि हेचि विनवणी केली
जें आयूर्ष्य[8] सिमा अतिक्रेमिली[9] : मर्त्य लोकिची ६६

तेह्वाळि तयापुढें : मियां[10] दिन्हेली[11] सातां दिवेसांची[12] गडे
म्हणौनि निजधामो[13] पुढें : जाईजैल आतां ६७

येदुवंशाचेया वेळुवना : जाळें ब्रह्मशापाचें पेटवन
म्हणोनि तयांचें पडैल[14] रण : थडिवां प्रभासाचिये ६८

समुद्राचें पाणी : सातवां दीं करील गांव घेणी
मियांविण ये[15] धरणी : कौंई[16] येकैक होईल ६९

१ ग. काळ. २ क. तिए. ३ ग. ए. ४ क एतसे. ग. ऐसेंचि एत ५ क ग. बीजें. ६ ग. आइकइं ७ क. ग. वाणी. ८ ग. आउक्षा सीमा. क. साउष्याची सीमा. ९ क. क्रमली. ग. अतिक्रमली. १० क. मीयां ११ क. दीधली. १२ग. दीसांची. १३ क ग. फुडें १४ग पडइल. १५ग काइ ए. १६क. काइ एक होइल. ग. एकक होइल.

पुणु हें आवघेंचि पांतां[1] आळीकें[2] : एकाचि वाटतसे भयानक
जे माझेया विरहाग्निची[3] उक : तुं कैसेनि साहासि ?" ७०

## १६

### उद्धव देवाची वियोग आवस्ता

या बोलाचा बासटु : न साहेचि उद्धवदेवो[4] सुभटु
विचारें घनवटु : पुणु पडिला तो ७१
तो जैसा करुणारसीं वीराला : किं विरहवीषें[5] घारैला
ना तरि सागरीं बुडाला : शोकांचिये[6] ७२
किं[7] दुःखेंसीं एकवटला : तो शांत—रसु मुराला
तैसा निचेष्टु जाला : भक्तराजु तो ७३
तर्‍ही विरह-विषांची[9] उकळी : प्राणातें कवळी
जीव ज्योति[10] झिळमेळी[11] : हृदया आंतु ७४

१ क. पाहातां. ग. २ अळीक. ३ ग. विरहाग्निचीया उका. ४ ग. देऊ० ५ ग. °वीखें ६ क. °चिये. ग. सोखाचीए. ७ ग. कीं. ८ ग. तेया. ९ वीरह वीखांची. १० कग जोति. ११ ग. झांळीमीळी. क. झिळिमिळि.

## १७

### उद्धवदेवाचा शोक

### (१)

उठौनि दडवांदडीं : देवो[1] सर्वांगें झाडी
मग आळींगौनि[2] भुजादंडीं : बैसविला तो ७५

उघडौनि डोळे : उद्धवदेवो बोले
" हें कां हो जी ! उसासिलें : हाथिएरेंत्रिणें[3] ? ७६

काई[4] माझें घेतलें विरूं[5] : कां बोलु बोलिला[6] निष्ठुरु ?
कां हो जी ! सांडित असा पुढारू : सन्निधानाचा ? ७७

पुढुतीं लागौनि श्रीचरणा : ऐसेंचि आलें देवाचेया मना
तरि आधीं आंगवना : मातें पाठवावें ७८

देवाकिया मूर्ति—चंद्रासवें : मौझि[7] प्राण—चंद्रिका स्रवे
ऐसें गोसांवीं करावें : आपुले पन ७९

तुझेया सन्निधानाचें चांदिनें : माझेया जिर्व[8]-चकोरांसि नंव्हें[9] पारणें
तारि सभावीं होईल मेव्हेवंनें[10] : या कळेवरासि ८०

माझा पढियाओ[11] : गोसावी बोलती तो आवघाचि वांवो[12]
यऱ्हवीं एकलेयां जीवों[13] : केवि आवडत असे ? ८१

१ ग. देउ॰ २ ग. आळींगुनि. ३ ग. ॰यरें ४ ग. काइ ५ ग. वीरूं. ६ क. बोलिलासि. ग. बोलिति. ७ ग. क. माझी ८ क ग. जींव ९ ग. न्हवे. १० क.ग. मेळ्वनें. ११ क. ॰याशो. ग ॰याउ॰ १२ ग वाउ॰. १३ ग. जाउ॰.

मज भक्तिंचा[1] वाजु : वरि तुं आत्मा निजु
तरि तुझेया विरहाग्निची[2] आकाळ वीजु : मी कैसेनि साहिन ८२
मज किरूं[3] तुझाचि वीनटु : म्हणौनि पातला हा सेवटु
परि तुझेनि विरहें हृदयस्फोटु : कवणें[4] नव्हे ? ८३

(२)

आजि [5]धर्मा आयुष्य पुरलें : विवेकाचें भांडार फुटलें
जिह्वार मोडलें : वैराग्याचें ८४
तुवां जगदेश्वरेंवीण[6] : सकळ कळां जाली नागवण
ब्रह्मविद्येचें अहेवॅ[7]—कांकण : आजि फुटलें ८५
आतां वेदां निढाळ : पुराणाचें सरलें डंबाळ
योगशास्त्रां जालें निम्हाळ : श्रीकृष्णराया तुवांविन ८६
उपनीषदां[9] उन्हाळा जाला : वेदां आकाळ मृत्यु घडला
[10]भक्तिची जिवनकळा : आजि गेली ८७
मुक्तिची[11] ठेवा हारतलो[12] : विज्ञानाचा मेठु[13] फुटला
आधारस्तंभु मोडला : शांतिचा पैं ८८

१ ग. भक्तीचा. २ ग. विरहाग्निची. ३ ग. कीरूं. ४ क. कवणा. ग. कवणासि न्हवे. ५ ग. धर्माचें. ६ जगदीश्वरें ७ ग. ऐहव. ८ क. ग. तुभांवीण. ९ क. °निषेंदा. ग. °नीखदां. १० ग. भगतिची. ११ ग. मुगुतिचा. १२ क. हारपला. १३ क. ग. मढु.

विश्वाचें आत्मधन गेलें : देवांचें प्राण—दुर्ग पडिलें
    सेजार आह्याळलें : दिव्य भोगांचें ८९

सर्व सुखाची साईली मोडली : आनंदाची खुलैरी[1] हारतली
    सर्वेधुर[2] वीघडिलीं : परब्रह्माची ९०

मोक्षाचा बाह्यौ[3] गेला : त्यागा जगबोळुँ[4] जाला
    सर्वस्वें नागवला : मर्त्य लोकु हा ९१

आतां वेल्हाळ वेधवंती[5] : जाली रीतहोती[6]
    स्वयंप्रकाशाची दिप्ति[7] : आजि माल्हर्वली[8] ९२

आजिं कैवल्य—रत्न विरोलें[9] : योगी[10] — हृदय भेदलें
    सर्वस्व गेलें : भक्तजनाचें ९३

आतां धैर्याचा समुद्र शोखलौ[11] : त्येजोंचा[12] वडवानळु विझाला
    मोहोमेरू[13] लोटला : महिमेचा पैं ९४

तुवां[14] विणे[15] श्रीरंगा : विजयश्री गेली भंगा
    सत्वाची गगनगंगा : आजि आटली ९५

सौभाग्यदेवता खोमली : येदुवंशं[16] वेलि तुटली
    चैतन्यकळा गेली : लोकत्रयाची ९६

१ क. खलौरि. ग. खुलुरी. २ क. स्वयंधुर विघडली. ग. सबंधुर. ३ क. वाहींया. ४ क. बोळ. ५ क. ग. वेधवंती. ६ क. रितहस्ती. ७ ग. दीप्ति. ८ क. मावल्ली. ९ ग वीरालें. १० क. योगिये हृदए. ११ ग. सोकला. १२ क. ग. तेणाचा. १३ क. महा°. १४ क. ग तुआं. १५ ग वीण १६ ग. यदु.

कीर्ती वैधव्य आलें : ऐश्वर्या उठखेळें[1] जालें
तारूं बुडालें : गुण–रत्नांचें ९७

सौंदर्य शिळावेलें[2] : औदार्य स्तवलें
पडप गेलें : वीरश्रियेचें[3] ९८

कामतत्व निमालें : संगीतें[4] सुख बुडालें
निर्यासें[5] गेलें : रसरायाचें ९९

प्रतापें[6]–सुर्यू मावळला : दैव–द्रुमु वनवला
विसांवा[7] मोडला : साधु जनांचा १००

ऋषीं[8] जोहर जालें : योगियांचें[9] जिह्वार कडाडिलें
अवचीतें[10] जगजुग पाडिलें : सनकादिकांवरि १०१

आतां महामोहाचां[11] काळवखां : पडिलेयां जिवां[12] अधोमुखां
ज्ञानचंद्रीची रेखा : सर्वज्ञा ! कवण दाविलें[13] ? १०२

सांडुनि जिव[14]–व्यापाराचें सुख : आतां मुक्तिचें[15] कापाडिक
तुं सांतेवं[16] राओ वांचौनि आणिक : कवण राखैल ? १०३

१ क. उटकळें. ग. उठकळें. २ ग. सीळावलें. ३ कग. श्रीयेचें ४ क ग. संगित. ५ ग. नीर्यास. ६ क. प्रतापाचा सूर्यो. ७ ग. वीसावा. ८ ग. रिखीं जौहर ९ क. यज्ञाचे. १० क ग. °चितें. ११ क. महा. १२ ग. जवीं. १३ क ग. दावलि. १४ क. जीव. १५ क. मुक्तीचें. ग. मुगतिचें. १६ क. सांतवां रावो. ग. सांतव राऊ–वांचुनि.

संसाराचेया डोहांतु[1] : उफाडे थावीं[2] असे जावों पांतु
तया जिवजातासि[3] हातु : कवण देईल ? १०४
विचार–दुर्गाचेयां[4] मढा : पडिलो[5] कामक्रोधाचा वेढा
तुवां विन योगियां उवेढा : कवण करील ? १०५
आत्मगंगेचां पाणियेडां[6] : थोकला अज्ञान–सीहांचा दडा
आतां कृपेचा कुऱ्हाडा : घेउनि कवण मारिलें[7] ? १०६
जंबु-दीपिचां[8] आखरीं : अधर्मु करीलें[9] गाव घेरी
आतां धर्माचां आभांरीं[10] : येदुरोया[11][12] ! कवण कोंशिल ? १०७
कवणांचां आभारीं : हे घातली भुतधात्री[13]
कां हो जि[14] ! संसार केला भारी : साधु जनासि ? १०८
कळियुगोंचां[15] तीव्रटना : कां हा धर्मु बैसविलें[16] कारीसवाना ?
आचाराचा उगाणा : जि[14] ! कवणा दीधला ? १०९
पोंषांडाचां[17] खळाळीं : कैसेनि सत्याची डोनि[18] मोकलीली ?
कां पाठि दीधली : जि ! विरश्रीयेसि ? ११०

१ क. ग. डोहा आंतु. २ क. उपड धावीं असे° ग. उपड धावीं असें जावों पाहातु. ३ क. ग. जीव°. ४ ग. °चीया. ५ क. ग. पडिलेयां. ६ ग. °यडां. ७ क. ग. मारील. ८ क. ग. दीपाचां. ९ क. करिल. १० क. ग. भारीं. ११ ग. यदु°. १२ ग. कासील. १३ ग. भूत°. १४ क. ग. जी. १५ क. योगाचां. १६ ग. °वीला. १७ क. पाखां°. ग. पाखं°. १८ क. डोनी.

वां करुणा केळि हाली[1] : विजयेश्रि[2] निवटिली[3]
कां [4]लक्ष्मि उसासिली : येदुराया! तुवां ? १११

( ३ )

तळहाताची साईली : देवें येदुवंशलते केली
ते कांहो जि ! खाळिये बैसविली : ब्रह्मशापाचिये ? ११२
तुवां सीहांसनीं[5] स्थापिला : तो उग्रसेनु कवणा[6] निरोविला[7] ?
वसुदेवाची जिवनं[8]कळा : घेउनि कां जातें[9] ? ११३
कटकटा ! धांत्रेया[10] ! : काई केलें या देवकिया ?
कां कुसि उसासुनियां : नेवविलें कैवल्य रत्न ? ११४
आतां नंदादिकांचें सरलें : येशोदेचें प्राणलींग फुटलें
वेसन-सागरिंचें प्रह्वाण बुडालें : पांडवांचें ११५
तीये[11] कुंतिये[12] उपनलें : पुणु पांचै तुझां [13]उसंगा सुदले[14]
तेयां[15] पांडवांचें आभारण घातलें : कवणा सांघे ? ११६
तया धर्माचा अडला : तुं चींतिला पावसि स्वामि[16] ! सळा
तरि कांहो जि ! आबोला : तेणेंसी घेत असा ? ११७

१ ग. हालि. २ क. ग. °श्री. ३ ग. नीवटीली. क. नीवटली.
४ क. ग. लक्ष्मी. ५ क. श्रिहा°. ६ ग. कवणासि. ७ ग. नीरो.
८ ग. जीवन. ९ क. जाता. ग. जातासि. १० क. ग. धात्रया.
११ कग. ते. १२ क. कुंतीए. ग. कोंतिय. १३ कग. उसंगीं.
१४ ग. सूदले. १५ क. ग. तेया. १६ क. स्वामी. ग. श्वामी.

पैजा सांडुनि[1] श्रीचक्रधरा : तुवां[2] हावासिलें[3] जयाचिया[4] कैवारा
तया पार्थी धनुर्धरा : कां वसिंबतें[5] ? ११८

अनेगीं संकटीं : देवो द्रपदिये करीति घरटी
तरि तीयेंचेया प्राणाची नाटि[6] : कवणा दीधली ? ११९

कुंतियेचा वनवासु : गोसांवियां होयें[7] असोसु
तरि तीयेचेया जिवितांचा[8] मोसु : घेउनि कैसेन जात[9] ? १२०

आहो जि[10] ! अवधारा : कुंतिये कैसे जालेति[11] लोभापरा ?
जें विरहाग्निचें पांचवनें चीर : नेसों देते[12] असा ! १२१

( ४ )

काई घेतलें वोखटें ? : कां हें विश्व केलें हींपुटें ?
जिवोद्धरणाचे पाटे फुटे : जि[10] ! कवणा दीधले ? १२२

कवण हो जि[10] ! आणिकु : केला ज्ञानसत्रिचा[13] चाळकु ?
मुक्ती साम्राजीं[14] सेश चौकु : कवणा[15] भरीला ? १२३

विज्ञान घनी आनंदीं : देवें कवणु केला तळपदी ?
वेधवंतियेची[16] सुदली मुदी : कवणाचां हातीं ? १२४

१ क. सांडौनि. २ क. ग. तुआं. ३ क. ग. हातवसीलें.
४ ग. जेयाचेया. ५ क. विसंभता. ग. वीसंबता. ६ ग. नाठी.
७ ग क. होए. ८ क. ग. जीविं॰. ९ क. ग. जाता. १० क. ग. जी.
११. क. ग. जालेति. १२ ग. देतसा १३ क. ज्ञानछात्रिचा.
१४ ग. सामराजीं सेस. क. सामग्री सेस. १५ क. कवण भरिल.
१६ क. वेधवंतिची. ग. वेधवंतीएची.

कवणा हो जी ! अवधार : दिधलें षड्[1]गुणांचें कुल्हार ?
ब्रह्मसुखाचें मळ्य पांचौर : जि[2]! कवणा वेचिलें ? १२५

आठे माहा सीद्धी : कें बैसविलिया कृपानिधी ! ?
कवणु केला वीधि : या विज्ञानासि ? १२६

सांघा स्वामी ! कवणाचियेे : हे भक्ति सुदालि उ[3]संगिये ?
मर्त्यलोकीं सुनियें : ब्रह्मविद्या कां सांडिली ? १२७

संसाराचा प्र[4]जनी . तुं सांडुनि जा[5]त प्रभु श्रीचक्रपाणि !
तरि जिवांतें ये धरणी : जि ! कवणा निरोविलें ? १२८

शिव ! शिव !! जगदीश्वरा ! : काई केलें या चराचरा
जि[6]वांचें जि[7]ह्वार : कां बा ! मोदिलें[8] ? १२९

(५)

आतां कव[9]णाचीये सेजे : फुलांचें अरल घा[10]लिजे ?
कवणा कापु[11]रें वोळ[12]गविजे : येदुराया ! तुवां विन ? १३०

सा[13]रीचां खेळना : आतां आनंदु क[14]वण सा[15]रिल रवना ?
कवणांतें मागावा जि[16]ना : ब्रह्मसुखाचा ? १३१

१ ग. खड्डुगुणाचें. २ क. ग. जी. ३ ग. उसंगीए. ४. क. परजनीं. ५ क. जाता. ६ क. ग. जीवाचें, ७ ग. जीह्वार. ८ क. कां मोडीलें. ९ क. ग. °चिये. १० क. घालीजे. ११ क. ग. कापुर. १२ ग. °वीजे. १३ क.ग. सारिचां. १४ ग. कवणु. १५ क. सारिल. १६ ग. जीना.

ब्रह्मादिकांचिया वारिपडी : बखलुनि कवणाचें[1] ताट काढीं ?
कवणाचीं आंगसीकें वेढीं : येदुराया ! तुवां विण ? १३२

आतां मज : कवण वाईल मंत्रिपणाचें भोज ?
तुं सांडिते[2] येदुराज : महीतळ हें १३३

नि[3]र्‍हां दासु : होतसे[4] भारिवसु[5]
मज तुंचि एकु साचांसु[6] : श्रीचक्रधरा ! पैं १३४

( ६ )

हरी ! हरी !! देवा ! : काइ कीजे या वज्रकठिणा जिवां[7] ?
कां विरहाग्निचा वनवा : आझुई राखवंडी न्हे[8] ? १३५

काई मियां[9] केलें : कां दुःखार्णवीं लोटिलें[10] ?
कां एकलेयां जि[11] ! मातें सांडिलें : कारणें वीन ? १३६

( ७ )

माझेनि हातेविण : देवो[12] न [13]करीति आरोगण
तें कां विस[14]रलेति आपुलेंपण : प्रभु एकें वेळें ! १३७

१ ग. कोणाचें. २ क. सांडीतु. ३ क. निरां. ग. नीन्हा. ४ क.ग. होत असे. ५ ग.भारीवासू. ६ क. साहावासु ग. सावासु. ७ क. ग. जीवा. ८ ग न्हवे. ९ क. मीयां. ग. मीआं. १० ग. लोटीलें. ११क. ग. जी. १२ग. देओ. १३ क. करिति. १४ ग. वीस°

मी नेदीं फोडी : तरि गोसावीं नेघेति[1] वीडी
तया लोभा खोडि[2] : कां वेगांचि लाविली[3] ? १३८

मातें गोकुळां पाठविलें : तैं[4] गोसावीं मादनें वर्जिले
तें स्नेह स्वामी ! कां वीटलें : कारणें वणि ? १३९

मी[5] उखेडीं[6] जायें अळग : तरि मागां नाहीं श्रृंघार वोळग
ते आवडि उरंगं[7] : आतां जाली : १४०

मज आंगसेवे नाहिं पवाडु : तरि त्यागा भोगा होए अपवाडु[8]
तो अनुरागु कां जाला कडु : आतां जिवीत[9]—नाथा ! १४१

( ८ )

प्रेम देतां वेळीं : मासीं सन्निधानाची भाष केली
ते कां हो जी ! सांडिली : वेळु न लगतां ? १४२

आतां देवो काई विसरले राणेपणें : येऱ्हवीं[10] तैंचि हें जालें बोलणें
जें मियां[11] प्राणा देयावें[12] मेळवणें : तुझां विरहीं १४३

देवेसीं जालेयां वीतुटि : आपणेयां नाणावी जीविताची कुटि
ऐसाचि निरोपु सेवटीं : गोसावीं दीधला १४४

१ क. नेघेति. २ क. खोडी. ३ ग. लावीली. ४ क. तौंचि. ५ क. मि. ६ क. उखरडी. ७ क. ग. कां. उरंग. ८ क. अवाडु. ग. अवीडु. ९ ग. जीवीत. १० क. ग. एऱ्हवीं. ११ क. ग. मीयां. १२ क. द्यावें.

तरि तो पुढारू आठवावा : आतां साचु करवा[1]
मज उधारू न घलावा : सन्निधानाचा १४५

तुं सांडित करुणाकरू : तरि दुखें दाटे[2] असे गह्वरू
सांघा जि[3] ! माझा आभारू : कवणा घातला ? १४६

( ९ )

कां आझुई हृदय न फुटे : प्राण-तंतु न तुटे ?
चोळाखा न फुटे : या कळेवराचा १४७

षट्[4]-चक्रांची उत्तरंडी[5] : आझुई कां न गडबडी ?
मेरु शिखर[6] केवि न फोडी : ईडा पींगळाते ? १४८

ब्रह्मरंध्राचां संपुटीं : आझुई कां वज्राग्नि तुठी ?
कां न जळे कोठी : यां इंद्रियांची ? १४९

तो मृत्यु काई जाला ? : कां मातें वीसरला ?
किं हाथिएरू[7] मोडला : अंतकाचा ? १५०

किं[8] काळांची[9] देशवेही[10] : वाचितां माझें नांव[11] नाहीं ?
किं पंचत्व पावेला[12] तोही : तुझेनि विरहें ? १५१

१ क.ग. करावा. २ क.ग.दाटत ३ क.ग. हो जी. ४ क. खड्ड. ग. खट्ट. ५ ग. उतुरूडी. ६ क. ग. मेरुशीखरं. ७ ग.हाथियारू. ८ ग.कीं. ९ क.काळाचीये. १० क. ग. देस°. ११ क.ग नावं. १२ क. ग. पातला.

तुं जि[1] ! नससि गोसावीं : तरि मी आपणपें मीरवीं
हेचि मज बरवी : काई श्लागयता[2] ? १५२

शयनासनभोजेनिं[3] : तुतें परमात्मेयांतें सांडुनि
आम्ही भक्तं[4] राहों कैसेनि : सांघैं चैतन्य—नाथा! "? १५३

## १८

श्रीकृष्ण चक्रवर्ती भणितलें ' उद्धवदेवा ! शोख नको करूं.
माझा प्रवृत्ति—विशेष वोळगैं. तुज माझा वीयोग नाहीं.
संसारादीकांसि कां भीतोसि '

तवं म्हणे यादव—तिलकुं[5] : " उद्धवदेवा ! न करीं शोकु
माझा प्रवृति-विशेखु : तुवां वोळगावा १५४

तुज वियोगु नाहीं मासीं[6] : [7]मीं सर्व भुतीं असें अहर्नीसीं
वरि देह तें तुं नव्हेसि : तरि मीरवावें तें[9] कवणें ? १५५

कां भितें[10] या संसारा ? : कां घेत अविद्येचा दरारा ?
[11]माझिये मायाशक्तिचा[12][13] घायवारा : काई न साहावे तुज?" १५६.

१ क. ग. जी नससी. २ ग. श्लाघ्यता. ३ क. ग. °भोजनीं.
४ ग. भक्त. ५ क. ग. टीळ्कु. ६ क. मजसीं. ७ क. मिं
८ ग. न्हवसी. ९ क. ग. * १० ग. भीत. ११ ग. माझीये.
१२ ग. °शक्तीचा १३ क. ग. मेटी.

येथें उद्धव देवाचें धाकडपण सांगितलें, अरिवर्ग जिंतेन या विषयीं.

तवं म्हणे भक्त-जगजेठि[1] : " जि[2] ! तुझिये[3] मुगुटीचिया बाटीं
मीं हेळसियां[4] उपटीं : शोकजाळ हें १५७

तुझी माळ घाली गळां : तरि माहा—मोहातें बांधें दळें[5]
[6]भु—गोळकाचां खळां : लोळवीं संसारू हा १५८

[7]अनुलेपनाचिया भूअरी : मीं अहंकारातें घोनारीं
[8]घाओ हाणौनि उतरीं दांतिरी : ए अविवेकाची १५९

तुझीं आंगसीकें[9] वेढिं : तरि कामक्रोधाचीं खीलि[10] कोढि[11]
दाढा उपडीं : मदमछराचियो[12] १६०

लें देवंकें[13] लेणें : तरि विषयांचें गिरिदुर्ग जिणें
उठवीं मान वळणें : इंद्रियांचीं[14] १६१

जी ! मी तुझा ताटकाढा : म्हणौनि वीध्नें[15] जात[16] पाउडां
मीं पाचारूनि जीणें फुडां : तुझियें[17] मायाशक्तितें १६२

१ क. ग. °जेठी. २ क. जां. ३ क. तुझेया. ग. तुझीए. ४ क. मी हेळस्या. ५ ग. दळां. ६ क. ग. ७ श. तुझेया अनुलेपनाचीया भुअरीं. ८ श. घाया. ९ गश. आंगसीकीं १० शकग. खाल. ११ शक. काढी. १२ गश. °मत्सराचीयां. १३ ग. देविकी. श. देविकें. १४ श. यां. १५ कग. विघ्नें. १६ क. जाति. ग. जात. श. जातसे. १७गश. तुझीये.

मी प्रेमें धाकडु : म्हणौनि मज नाहीं कऱ्हणांचा पाडु
मी नव्हें सचाडु : तुझेया ब्रह्मपदालागि १६३

जिणौनि मनातें : जे वळघले ज्ञानाचियें[1] वर्त्ते[2]
ते टाकितु ब्रह्मपदातें : संतें[3] संन्यासियें[4] १६४

आम्ही पुण ए भुमिरंगीं[5] : भवतें[6] असों ये कर्म-मार्गीं
तऱ्हीं प्रेमाचाँ[7] कडलगीं[8] : टाकुनि[9] कैवल्य—दुर्ग १६५

भक्तांचिया मीळनीं : होइल तुझिये कथेची दीवेलावनि
तारि सभावीं फीटैल मेऌ्हवंनी[10] : अज्ञान—तमाची १६६

म्हणौनि मायाशाक्ति कीरू[11] नांगवे : पारि हे वीरहवेथा[12] न साहावे
तारि आतां काई करावें ! : तें गोसांवी[13] सांघतु" १६७

## २०

सन्निधान स्थीति पुरुष, तया असन्निधान जालेयां तेणेंचि धर्में वर्तावें, भणौनि येथ पुरुष संयोग वियोगाचे जन्म-जीवीताचें पुरुष सांघितलें: आन संपताइी पुरुष उपसंहारीं जाणावें हें असान्निधान अस्तीपरी.

तवं कैवल्यनाथें म्हणितलें : " तुवां प्रेमांचोनि[14] बळें
मायाचक्र जिंतलें : हें फुडें कीरू[15] १६८

१ कग. चीए. २ कश. वर्तेतें. ३ कग. शांत. ४ कश संन्यासी. ५ ग. भूमीं. श. भवरंगीं. ६ श. भवतसों. ७ कगश. प्रेमाचां. ८ ग. कडेलगीं. श. कडिलगीं. ९ क टाकौनि. १० कगश. मेहळनी. ११ गश. नागवे. १२ श. वीरह अवस्था. १३ श. गोसांवी. १४ क. प्रमयांचेनि. १५ श. किरु नव्हे.

तर्‍हीं[1] आपुलिया प्रवृत्ती : तुज सांघैन वियोगिची स्थीति
तें आईक[2] भक्तचेंक्रवर्ती[3] ! : अवधान देउनि १६९

माझेंया[4] विरहाग्निचेनि पुटें : जिवाचें भांगार आटे
तरि मुक्तिचा मोळा उमटे : अंतरात्मेयांसि १७०

कळेवराचियेंया[5] कावलासाटीं : लाहिजे कैवल्याची सोनेवाटी[6]
तंरि[7] विर्रहवेथेचां[8] हाटीं : पालटु किजे[9] १७१

पुण माझेनि विरहविखें : न जळे [10]शंरिराचें चोळाखें
तर्‍हीं अवस्थेचेनि कंडलेखें[11] : वरील दी[12] लोटावे १७२

जैसी अवस्थाभरे विरहीणी : करितां न मनीं धावनी
नेणे चंद्रकीरणी : वोल्हावितां १७३

तैसे माझेनि वीरहज्वरें : नावडे भोगाचें साबरें
रसभांवोचेनि[13] तुषांरें[14] : मुसावे तो १७४

तया [15]वीषये—सुख तीडिकाय : स्वर्गसुख चुडुफाय
ब्रह्मादि सुखें कोमाये : ज्ञानियां तो १७५

तेंया[16] आनंदाचें आरोचक : शांभव वेधांचीं[17] कुळिक
शीशीं बैसे पीक : पुण्यफळांचें[18] १७६

१ श. °ळेया. २ गश. आइकै. ३ श. भगत-जगजेठी. ४ क. माझेनि. ५ कगश. °चेया. ६ श. बोनेवाटी. ७ क. नरि. ८ श. वीरह अवस्थेचां. ९ कगश. कीजे. १० कगश. करीं. ११ श. कडीलेखें. १२ क. दीस. १३ श. °चेन. १४ गश. तुखारें. १५ श. वीख°. १६ गश. तेया. १७ श. वेदांचें. १८ ग. °फळाची.

म्हणौनि माझेया वीरहव्यथा : तुज सुख नाहीं सर्वथा
तरि वियोगिची अवस्था : आतां आईक तुं १७७

जैसी सैयां[1] पाळितां : आणिकेंसीं न रमे कांता
तैसी होआवी अनन्यता : माझां वियोगीं १७८

मियां विण महितेळीं[2] : एकत्र नसावें कव्हणी काळीं
जग अधर्माचां जाळीं : कैवळील[3] हें १७९

विषयांचेया पायारवां[4] : सेवें[5] लागे श्रृंगाराचा[6] सडिवा
तो प्रदेशु वर्जावा : अमंगळु तुवां १८०

जेथ मदनाचां बाणीं : घायवटे तरुणी
तिये[7] नगर-पुर-पाटणीं : वासु न करावा १८१

वीर्षयांचिया[8] उलींगवाडी : वीकारें[9] वीचारातें आझोडी
म्हणौनि नसावें अर्धघडीं : भोगु वेनांतु[10] १८२

असावें गिरि-कपाटीं : शिळातळीं वाळुवंटीं
झाडाचां[11] तळवटीं : बहुत करूनि १८३

सत्वाचेनि वोलासें[12] : बोधतरु वेल्हावतु[13] दीसे
तेणें तेणें प्रदेशें : असावें वितरागीं[14] १८४

१ गश. सैद्या. क. शय्या. २ कगश. मही° ३ ग कवळीलें.
४ गश. पाइरवां. ५ श. सवै. ६ श. श्रींघा°. ७ श. तया.
८ क.विख°. ग.विष°. ९ कश.विकार. १० कश.भोग भुवनांतु.
११ श. नातरि झाडांचा. १२ कश. वोल्हासें. १३ ग वोल्हा°.
१४ क.वीत°.

मीळे मुनीची मांदी : तैरि[1] निंदास्तुतिची होय गेवांदि[2]
म्हणौनि कऱ्हणाचां बिणिदीं[3] : न रीगावें तुंवां[4]. १८५

बहुतांचा मेळावा : ऐकमेकेसीं[5] उपजे हेवा
मग कळहाग्निचा[6] वणवा : उठी येकें[7] वेळें १८६

दुजेयाचां संगीं : पडे स्नेहाची वज्रांगी
गोष्टि[8] मातु करी वाउगी : वेळु फेडावेयां १८७

पैशुन्याचेनि रंगें : धुनि सर्वांगें[9]
पुण्यातें म्हणे उगें : नावेक वेऱ्हीं १८८

संग-तरूचेनि आधारें : येवढि[10] संसार-वेलि पसरे
म्हणौनि त्यागाचेनि कुठारें : तोडावा संगु[11]-द्रमु १८९

झोंबौनि वै(रा)ग्याचा कडा : टाकी ज्ञान-दुर्गाचा हुडा
तोहि पडे आंतु[12] संसाराचेया अगडा : संगास्तव[13] १९०

धाडुनि विवेकाचें उपलाणें : उठवावें आळींबनाचें ठाणें
मग एकाकी वीचरावें तेणें : महिमंडळीं १९१

विरालीं कुंचिळें[14] : पांगुरावीं वल्कलें
अथवा झेळाळेचीं[15] पातळें : दीगांबरें[16] १९२

१ ग. तेथें २ गश. गवांदी. ३ गश. बीणदी. ४ गश. तुआं.
५ श. यकमेकां. ६ श. काझीचा. ७ श. एके. ८ श. गोठि.
९ श. °वया. १० ग. एवडी ११ ग. संगं. १२ गश.*
१३ग.आंतु°. १४ ग. कुचैलें. १५ श.झळाळींतें. १६ गश. दिगंबरें.

भूमंडळाचिए सेजे : लाहानवतियेचें अरळें[1] घालिजे
तेथ शयन कीजे : दमने[2]शिळें १९३

रसाचें मुळपीठें[3] : [4]इंद्रियांची उत्तरवेंठें[5]
ते जिणावें धुळिकोठें[6] : रसनेचें पैं[7] १९४

जिह्वेचियें[8] चोरवंटे[9] : अवघडे दोणिचि बोटें
तेथ माधुर्याचीं दांगटें : आंझोडिति[10] धैर्यातें १९५

म्हणौनि उधवदेवा! : सांडावा रसनेचा थडिवा
मग न करी नागोवा : रसेना[11] डोंडु[12] हा १९६

निराहारतेचियें[13] वांजौठी[14] : जंव जंव इंद्रियांतें दंळवटी[15]
तंव तंव डांडाति उठी : रसना—[16]लांसि १९७

विचारांचेनि फरसें : [17]जीव्हेचें सावज उसासे
तारि प्रबोधरत्न अनायासें : हें[18]तां चढे १९८

सीरौनि[19] सयमांचां दांडीं : हे रसना घालिजे बांधौडि
तरि चोरों[20]कुळ होये देशधडी : इंद्रियांचें १९९

१ ग. अरळ. २ गश. °सीळें. ३ श. पिठ. ४ श. इंद्री° ५ गश. उतर. ६ श. धुल्कोठ. ग. °कोट. ७ गश. * ८ ग. जिभेचीये ९ गश. °वाटे. १० श. आझुडीति. ११ गश. रस. १२ ग. दोंडु १३ श नीराहारतेचीया. ग. °ची. १४ गश. टी. १५ गश. घायवटी. १६ गश. लाहांभि हे. १७ ग. जिभेचें. १८ गश. हाथा. १९ ग. सीरुनि. २० ग. चोर°.

म्हणौनि वीचाराचीये कडाडी : घालुनि वैराग्याची उडी
करावी कोरडी : या कळेवराची २००

आईकैं भक्तराया ! : ऐसेनि[1] सयेमें असे[2] योगीया
तयाची सर्वसाया[3] : सांघैन तुज २०१

आहाराचेनि संकटें : पाठि पोट येकवटे[4]
वरि शिराजाळ उमटे : वाणेलग २०२

जठराग्निचां[5] उबाळां : उकडे मेदमासांचा गोळा
ठावो[6] न लगे[7] डोळां . खोलपणें २०३

अस्थि[8] यंत्र कीडिकीडी[9] : संधि कळासु कडकडी
चालतां गडबडी : चरणद्वय २०४

काढति भुजायुगुळें : जिरति कपोळें
सर्वांगें होति निबळें[10] : विकळपणें[11] २०५

तया प्रेतसायाचा पाखाळु : रंकपणाचा उजाळु
तो दिसे विकराळु : निहाळितां[12] २०६

तया मरणेंसीं धरणें : [13]दुखेंसीं साजणें
तो देयावेया उठी मेव्हवने[14] : या कळेवरासि २०७

१ श. ऐसेन. २ ग. असे तो. ३ ग. सवं° श. संसाया. ४ गश. यक° ५ °ग्निचा. ६ गश. थाउ. ७ श. लभे. ८ ग. अस्थि. ९ श कीड°. १० गश. वीकळें. ११ गश. निबळ° १२ गश. नीहा°. १३ ग. कीं दुखेसीं. १४ गश. मेळ्वणें.

तया विरक्तिचे[1] डो[2]हेळे : माहातापाचे सोहे[3]ळे
म्हणौनि तुं[4]वांहि द[5]मनशिळें : तैसे[6]यांचि होआवें २०८

इंद्रियांचां चाकवरां : झणें भवसि गरगरां
विकल्पाचा प्रळयवारा : आपणयां लागों नेदीं २०९

परमौणुचिये भुमिके : जेंतुलें दृश्यजात फांके
तेतुलें जाण लटिकें : मायामय २१०

आत्म-लोहाचां दर्पणी : करात्री ईश्वरध्यानाची रजनी
मग गर्भीं वेधैल निर्वाणी : ब्रह्मरसें २११

शमदमाचा करूनि मेळावा : ईंद्रियांचा बिडगौ जिणावा
मग ब्रह्मसाक्षात्कारीं रीगावां : तुज मी करीन २१२

तेथ होसि आरूढु : तारे जिणौनि विघ्नाचा अगडु
कैवल्याचां सेजारीं पहुडु : होईल तुज " २१३

१ गश. बिरगतीचे. २ श. डोहोळे. ३ श. सोहोळे. ४ श ही.
५ गश. °सीळे. ६ ग. तैसे°. ७ गश. चाकोरा. ८ ग वं°क°.
९ ग. णेया. श. नेया. १० गश. वेदीं. ११ गश. प्रमाणुं.
१२ श लटकें. १३ श. करूनी. १४ गश बडिगौ.
१५ श. कारें°. १६ गश. वी°. १७ श. आगडू.
१८ गश. होईळ.

## २१

तवं उद्धवदेवीं भणितलें 'जी ! हा मागिल
आचार सांगितला, तो मज होववेना '

तवं उद्धवदेवो[1] म्हणे : " जी ! माझिये आंगवणे
आचार-दुर्गीं उपेणें : होववेना। २१४

कमळ–नळांचिये सांखळे : ऐरावतु कवणा आकळे ?
मुंगिये केवि पोटाळे : महदाकाश ? २१५

मृणाळ–सुतांचिये[2] वागुरे : प्रळयानिळु[3] कां संवरे[4] ?
दिवाकरू कैसेनि आवरे : छायामंडळासि[5] ? २१६

मशकाचेनि थार्टे : माहा मेरू कां[6] लोटे ?
हातोबाँ[7] केवि आटे : अंभोनिधि ? २१७

तैसें आचार–खर्गांचिये[8] धारे : कैसेनि माझें पाउल थारे ?
म्हणौनि सर्व प्रकारें : नांगवे[9] हें " २१८

१ गशा. °देओ. २ गशा. चीये. ३ गशा. °नीळु. ४ गशा. सावरे. ५ शा. साया° ६ शा. केवि. ७ ग. हाथउबा. शा. हाथोबा. ८ गशा. खड्गा°. ९ शा. नागवे.

## २२

या उपर देवें भणितलें ' सकळाचा संन्यास
तो जीवींचे करावा. हा देवाचा कड नव्हे.'

तवं म्हणे दानवसीरसाटु : " उद्धवदेवा ! न संडीं लाटु
नावेक घे पां नेटु : येणें आचार–विरेंसीं[1] २१९
न जीणे[2] केतकीची कांटी : तरि गाभेवनाचां संपुटीं
मकरंदाची[3] बोनेवटी : भ्रमरु केवि आरोगी ? २२०
उपवासाचेनि सीणें : जरि चकोरू न बैसे धरणें
तरि चंद्रकरांचें पारणें : केवि होए ? २२१
क्षिरें[4]सागरीं घरडेंहुळि[5] : देवें[6] न करिते बळोवाळि
तरि अमृताची पानकेळि : केवि करिते ? २२२
तैसें वीरांक्तिचीये[7] भूर्तावळी[8] : नेदिजे देहदमनाची बळि
तरि केवि आंतुडे रसाताळिं : कैवल्यनिधान ? २२३
आतां असो हा प्रसंगु : जालेयां माझा वियोगु
तुवां सकळांचा त्यागु : करावा विशेषतां[9] २२४

१ गश. वीरेसी. २ ग. जीणतां. ३ श. मगरंदाची.
४ ग. खीर. श. क्षीर. ५ गश. डहुळी. ६ श. देओ.
७ गश. वीरगती° ८ श. भुता° ९ ग. विशेखता.

हें जाण पां निर्धारें[1] : मियें[2] त्यागाचें[3] केलें एकदरें
टाकावेया चवरें : मुक्ति-दुर्गाचें[4] २२५
अज्ञानावारी करूनि आवेसु : दाखविलें[5] ब्रह्मविद्येचा मोसु
तो करावा सन्यासु : भलतेया[6] परी" २२६

## २३

मग उद्धवदेवीं भणितलें "जी! अंतर दोष त्याग संन्यास, जीवा होववेना देवाचीया अनुरागेंवीण आन ईश्वरीचि कृपेवीण."

तवं म्हणे भार्गवत-भुषणु : " तुं सकळ योगांचा दर्पणु
तुवां[8] त्यागु बोलिला सन्यासलक्षणु : निश्रेयालागि २२७
तारि त्यागु निर्‍हां दुआडु[9] : वरि ईंद्रियांचा कैवाडु
तेथ काईसा पोडु : विषयात्मकाचा! २२८
त्यागाची धरोपरि[11] : घरींचि असतां साजिरी
शिव! शिव!! कदनाची विवसी संसारीं : कवणु नेघे? २२९
जीणवति गजघंटा : सीहेंसीं[12] येईजैलें[13] अवचटा
पारि विषयेत्यागाचिये वाटा : कव्हणा जाववे ना २३०

१ गश नीर्धारें. २ गश. मीया. ३ गश. केलें त्यागाचें. ४ °वीं. ५ गश. दाखवी. ६ ग. भलेतिया°. ७ ग. भक्त ८ गश. तुआं. ९ गश. दुवाडु. १० ग. माझा पाडु. ११ गश धरोफरी. १२ श सिहेंसीं, १३ गश. येइलैल.

कुळाचळाचे घांटे[1] : चुरिजति करपुटें
पारि विषयेवज्र तुटे : ऐसा केव्हणीं[2] देखो[3] नां २३१

किजैल ईंद्रियांचा मारू : प्राणापानाचा समाहारु[4]
पारि फळवासनेचा अंकुरु : कव्हणा खुंडेचि[5] ना २३२

तुझेया अनुरागाचें वीरढें : जयाचिये हृदये—भूमिके[6] न वढे
तयासि कँहिंचि[7] त्यागु न घडे : ऐसी मीझी[8] मति २३३

अविवेचिया वज्रसांखळा : चहुंकडे आळिलां[9]
वारि ममतेचां खीळां : गाडिलां मीं २३४

अभिळाषांचा[10] वेढा : पडिला असे गाढा
मर्दनाचां[11] कुऱ्हाडां : घायेवटलां असें[12] २३५

निऱ्हां दास : लागले स्नेहपाश
तया काईसी आस : त्यागाची आतां २३६

निरुपनाचां रंगाचळीं : त्यागाचें आढाळ चाळीं
ऐसा कव्हणीं न देखें भूतळीं : तुं वांचुनि[13] २३७

तुझा कृपाकटाक्षु जोडे सारथी : तै रीगावां होये त्यागपथीं
कैवल्य-रत्न चढे हातीं : वेळु न लागतां " २३८

१ शा. घाटें. २ गशा. कव्हणी. ३ ग. देखें. ४ ग. समहारू. ५ शा. खुडवे. ६ ग. भूमीकेसी. ७ गशा. कहींचि. ८ गशा. तवं माझी. ९ शा. आळिला. १० ग. °खाचां. ११ गशा. वारि मद°. १२ शा. मीं. १३ गशा. वांचौनि.

## २४

तंव सर्वज्ञें भणितलें " सकळा नीरोधाचा त्याग अपुलीया अंग-
वणा कुरावा. हा जीवाचा कड. ईश्वर-हेत पाहें नैये. "

तवं म्हणे नागार्जुनाचा दातारु : " उद्धवदेवा ! हा संसारु
जीणावा दुरंधरु : आपुलिया आंगवणा २३९

रोगिया उपजे पीडा : तरि वैद्या नेदिजे काढा
जैताचियां चाडा : सरवेदेया हातवसुं नैये २४०

रणीं जुझारू घायेवटे : तरि वणियां न बंधिजाति पाटे
विरहिणी कांतु नें भेटे : तरि सखिये उपचारू नाहीं २४१

तैसें आईकें भक्तराजा ! : हें त्यागाचें भोज
तुझीयां वारिया मज : नाचों नैये २४२

काढुनि माहा मोहाचा मागु : सांडवी ब्रह्मवीद्येचा लागु
तो सकळांचा त्यागु : तुवांचि करावा २४३

आपुलेनि आंगबळें : रिगौनि त्यागाचें खळें
विचाराचेनि दीर्धलें : खोंचावा संसार-शत्रु २४४

लोक-तत्वाचे पेरिखी : लाह्नुनि तनु मानुखी
ज्ञानाचां लोहनखीं : तोडीति[११] भवबंधातें २४५

१ श. चेया. २ श. सर्व. ३ ग. नैए. श. नैय. ४ ग. वणेयां.
५ गश. ने भटे. ६ गश. तुझेया. ७ ग. नै ए. ८ गश. तुआंचि.
९ श. दिघळें. १० ग. पारिखी. ११ श. तोडित.

वैराग्याचेनि कुटें : मनुष्य–देहाचा आरिसा उटे
 तरि तेथ ठसा उमटे : इश्वर–तत्वाचा १४६

सृष्टिचिये[1] टांकसाळे : शरिरांचें मोप पडिलें
 पुण आवघेंचि जालें चोरमोळें : नरदेह वांचौनि[2] २४७

तें लाहुनि मनुष्य–देहाचें नाणें : ज्ञानाचेनि उदारपणें
 जाणतां दीधलें मेळवणें[3] : या संसारासि २४८·

## २५

यदुअवधूताचा संवाद : तेणेंही तैसेंचि केलें

एचि अर्थीं आतां : तुज इतीहासु सांघैन विरक्ता !
 जो[4] येदु अवधुता : पुर्वीं संवादु जाला २४९

## २६

अवधुताचां ठाइं ज्ञानत्रिक बाणला

तो अवधुतु : मूर्त्ती तरि शांतु
 परि काळसि कृतांतु[5] : होऊनि ठेला २५०

तो वैराग्याचा कांतिउं[6] : किं[7] माहा तपाचा वोतिउं[8]
 किं निवृतिचा थळिउं[9] : वोडवला तो २५१

१ ग. सृष्टी°. श शृष्टि° २ श. वांचुनि. ३ श. मेळवणें. ४ श. जो पूर्वी यदु अवधूताः संवादु जाला. ५ श. कृदांतु. ६ गश. कांतीउं ७ ग. कीं. ८ ग. वोतीउं. ९ गश. थळीउं.

कि भक्तिचा वाटेकारू[1] : ज्ञानाचा[2] निडारू
नां तारि जगासि पुढारू : मोक्षाचा तो २५२

तो[3] वीवेकु[4] वेठला : कि प्रबोधु बोधला
नां तारि योगुचि मूर्तीसि आला : अवधुत वेषें[5] २५३

तो जगा वेगळा : असे योगि लिळा[6]
विचरे एकला : महि—मंडळीं २५४

## २७

### अवधूताची भेट आन रायाचें स्तवन

तो खेळतु मेदिनी : पातला येदुंची[7] राजधानि[8]
तेथ राहिला तपोवनीं : सीद्धनाथिचां[9] २५५

कऱ्हणी एकि वेळीं : एदु निगाला विहाळी[10]
तवं देखिला झाडातळि : अवधुतु तो २५६

तेथें[11] चरण नमस्कारिले[12] : मग रायें पुसिलें
'कै जी! बीजें केलें : तुम्हीं या नगरासि? २५७

तुम्हां हींडतां ए सृष्टी : ऐसी कवणे पुरुषेंसीं[13] जाली भेटि
जिया संसाराची दाटि : वैर्नविली[14] एकें वेळें? २५८

१ श. करू°. २ श. कीं ज्ञानाचा. ३ श. ना तो. ४ श. विवेकु. ५ गश. °वेखें. ६ श. लीळा. ७ श. यदुरायाची. ८ ग °धानि. °ध्वानि. ९ श. सीधनाथाचां. १० ग. वीहाळी. श. व्याहाळी. ११ श. ते. १२ गश. °रीले. १३ ग. पुरखेंसीं १४ गश °वली.

करुणाचा मनोमासा : न धवे अर्थकामाचिया[1] आवीसा
या धर्मीचो[2] प्रसंसा : कवण[3] न करी ? २५९

तुं आंगवणा पुरता : सकळ कळा जाणता
ऐसांहिं[4] अकर्त्ता : हें मज नवल पैं ! २६०

जड उन्मीतें[5] पीसें : खेळत असति[6] तैसें
येऱ्हवीं ज्ञानाचेनि प्रकाशें[7] : देखसि[8] चराचर तुं २६१

कामलोभाचेनि दावानळें : हें भुतजात वनवलें
तेथ ज्ञान हदीं[9]-ओल्हांविलें[10] : तुझें आंग २६२

आत्मेयांचां आळां : विण विषेयांचिया बोला
कैसेनि कोंभैला : आनंदु तुज ? २६३

## २८

### अवधुत गुरू—ज्ञानपंथें नीरूपण

आईकैं उद्धवदेवा ! : एदु[11] पुसिलें[12] ऐसेयां[13] सवा
मग ज्ञानपंथुं[14] बरवा : अवधुतु निरुपिता जाला २६४

म्हणे राया आइक : मज गुरु असति अनेक
तेतुलेयां पासौनि एकेकें[15] : मी सीखता जालां २६५

१ ग. °चेया. २ गश. धर्मांची. ३ श. कवणु. ४ ग. हीं.
५ गश. उन्मत ६ गश. असती. ७ श. प्रकासें. ८ श. देखसी.
९ श. हृदइं. १० श. वोल्हां°. ११ ग. वीखं. १२ श. पुसीलें.
१३ ग. ऐसीया. १४ ग. °पंथु. १५ श. एकएक.

## २९

चोविस गुरु अनुक्रमें

पृथ्वी पवनु : आकाश जळ हुताशनु
कुमोद–बंधु भानु : कपोता अजगरू २६६

सींधु पतंगु मधुकरू : गजु मधुवा कृष्णसारू
मीनु पींगळा कुररु : बाळकु[1] कुमारि २६७

सेळारा फणिमौळी : उर्णनाभि झीलि[2]
यां चोविसां[3] गुरूंची बोळि : सांघितली तुज २६८

## ३०

जयाचां ठाई जेतुका गुण येचि अर्थि गुरु.
एन्हवीं जीवां गुरु ज्ञानपथी ईश्वर

यांचें वर्तन : मंज[4] मोक्ष–साधन
म्हणौनि देउनि अवधान : मिं[5] सीखिलां[6] तें २६९

येचि अर्थी : मंज[7] गुरु बोलिजती[8]
येन्हवीं जिवा गुरू ज्ञानपंथीं : ईश्वरू[9] तो २७०

तरि जें जया जवळें : राया ! मियां जाणितलें
तेतुलीं सांघिजति[10] स्थळें : विस्तारूनि २७१

१ गश. बाळ. २ गश. झीली. ३ श. चौविसां ४ गश. तें मज. ५ गश. मीं. ६ श. सीखलां. ७ ग. हे मज. ८ श. बोली. ९ ग. इश्वराचे. १० श. सांघीजति.

कथेचेनि अनुसंधानें : सांघिजातिल चोविसै आल्यानें
जेहीं रसकेळि खेळति मनें : कळाविदांचीं २७२

## ३१

[ १ ] पृथ्वी गुरु. धैर्य न संडावें यदर्थी

पंरिहसैं भूपाळा ! : मि [2] क्षेमेचा निर्वाळा
आदरें सिखलौं [3] : विश्वंभरे पासौनि २७३

सर्वांगें विदारिति भूतें : पारि पृथ्वी न संडी धैर्यातें
तैसें देहींतु पंतलेयां हिं धर्मातें : न मोकलीं मीं २७४

## ३२

[ २ ] वायो गुरु. आखंड भ्रमण. तया रसाची
चाड नाहीं. नसुधेन अन्नमात्रेन तोखे.

वायो हिंडे चराचरीं : पारि आश्रो केहि [6] न धरी
निराश्रया तियापैंरी : यती होआवें २७५

रसाची कहीं : प्राणा चाड नाहिं
तो पंरितोषे देहीं : अन्नमात्रें २७६

१ गश. परिएसै. २गश. मी. ३गश.सीखिलां. ४ गश. देहांतुही.
५ गश. पातलेयां. ६ ग. कहीं. श. कहींचि. ७ श. यापरी.
८ गश.नाहीं. ९ गश.परीतोखे.

न म्हणे शिळें[1] उन्ह : सदन कां कदन
न करी हे विवंचनो[2] : प्राणु जैसा २७७

जैरि[3] आहारूचि नेघे : तारि देहत्यागीं निमीत्त्य लागे
आंणि[4] रसाचेनि संगें : धर्मी निबळु जाये २७८

या कारणें राया ! : वायू गुरू केला मियों[5]
असे ऐकाकिया[6] : पवनु जैसा २७९

## ३३

[ ३ ] आकाश गुरू. काळगुणीं न सींपे-योगेश्वर.

मेघांचेनि वडपें : आकाश कँहिं[7] न लींपे[8]
तैसा काळगुणी न सींपे[9] : योगिया तो २८०

## ३४

[ ४ ] जल गुरु. आपण शुद्ध आन अणीकातेंही शुद्ध करी भणौनि.

जैसें कां जिवंनें[10] : स्वच्छ स्वंभाव[11]—प्रसन्न
तैसें रजस्तमी विहींन[12] : मन निर्मळ[13] होआवें २८१

१ गशा. सीळें. २ शा. वीवचंना. ३ गशा. *. ४ शा. *.
५ शा. मीयां. ६ गशा. एकां°. ७ गशा. कहीं. ८ शा. सींपे.
९ शा. लींपे. १० गशा. जीवन. ११ ग. भावें°. शा. भावीं°.
१२ ग. विहीन. १३ गशा. नीर्मळ.

आनीकं[1] आचारें पवीत्रतो[2] : होए तीर्थभुतता
बोलौनि प्रमयामृता : धेरू[3] जाला जो २८२

कषायांचे[4] काट : फेडुंनि[5] किंजति[6] धुवट
तैसें होआवें चोखट : अंतःकरंण[7] २८३

## ३५

[ ५ ] अग्नि गुरू. आचार आन विचाराचां ठाइं पुरतेंपण तेणें.

आचारू आणि[8] विचारू : जाणावेंया[9] अग्नि गुरू
केला तो प्रकारू : आईक राया ! २८४

तापसपणें निलागु : अग्नि नव्हे असळेंगु[10]
तैसा होआवा निसंगु : एकांतनिष्टु २८५

पात्नादि आलींबेनें[11] : नोहिं[12] हुताशना
स्वीकरांवेंया[13] अन्ना : उदराचि पात्र २८६

पवित्रां[14] अपवीतें दोन्हीं : जैसीं [15]कों नाहीं वह्नि[16]
आणि पापपुण्य चीह्नि : घेपवेना २८७

१ ग. आणि श. आनि. २ श. योग्यता. ३ गश. धर.
४ गश. कखा°. ५ श. फेडूनि. ६ गश. कीजति.
७ गश. अंतष्करण. ८ ग आनि श. आनीक. ९ श. °वया.
१० गश. आस°. ११ श. आलंबन. १२ गश. नाहीं.
१३ ग. स्विकरावेया. १४ गश. पवीत्रापवीत्रें १५ गश. *.
१६ ग. वन्हीं. श. वन्ही.

ईश्वर प्रतीती आनणें : तारि अग्नि गुरू करणें
तें आईक अंतःकरणें : सावधानें २८८

जैसा काष्ठांतु : अग्नि असे सर्वगतु
पुणु प्राणियांसि नव्हे हेतु : दृष्टादृष्टीं २८९

तोचि जेह्वळां[1] होये प्रकटु : तेह्वळां[2] भजनें जोडे आदृष्टु[3]
पाकनिष्पति दृष्टु : एकांसि[4] होए २९०

तैसा परमेश्वरू : सर्वात्मा निराकारू
परि जिवांसि[5] साकारू : उपकारकु २९१

ऐसें ईश्वरतत्व : श्रीमूर्त्तिचें शुध्दत्व
जाणावेया गुरूत्व : अग्निचें पैं २९२

## ३६

[ ६ ] चंद्र गुरू. कळा वोहट, परि चंद्रीं नाहीं ( तो नित्य )

शरिरा[6] जन्म मरण : जीउ नित्यँ[7] जाणु
चंद्र या खुणा : मियां गुरू केला २९३

कळां वोहर्ट[8] चढु : परि चंद्रि नाहिं[9] विघडु
षडभावा[10] विकारा पाडु तैसा देहीं २९४

१ ग. जेव्हाळि. २ श. तेव्हळिं. ३ गश. अदृष्ट. ४ गश. एका
५ गश. जीवांसि. ६ गश. शरीरा. ७ गश. नीत्यु.
८ गश. वोहट. ९ गश. नाहीं. १० ग खडुभावीं. श खड्भाव.

## ३७

[ ७ ] सूर्य गुरू ( तया ऐसें प्रकाशक दुजें नाहीं,तेवि ईश्वरज्ञानें वांचौनि मोक्ष नाहीं.)

सूर्यू जेणें अंशें : मियां गुरू केला असे
प्रकाशक तया ऐसें : दुजें नाहिं २९५

तेज असे तारागणीं : पारि अंधकाराची गवसनी
फेडावया दिनेमणी वांचौनि : आणीकु[3] नाहीं २९६

दीपें घरोघरीं : असति कोडि संख्या वेन्हीं
पारि [6]समग्रें अंधेंकारीं : राहाटों नये २९७

तैसें[8] नाना देवतां साधनें : अंतरबाह्य भजनें
पारि मोक्षु तो परमेश्वर–ज्ञानें : वांचौनि नाहीं २९८

अद्वैत प्रतीती बळें : न फिटति भ्रांतिचीं पटळें
चांदिनेयांचें झावळें : देखणें जैसें २९९

निजांशें आधीष्ठात्री : सूर्यू देवता नेत्रीं
स्वरूपें निज–क्षेत्रीं : असतुचि असे ३००

तैसा परमेश्वरु निजांशें : सर्व भुतीं[10] असे
पारि संपुर्णता दीसे : स्वस्वरूपीं ३०१

१ श. सूर्यो, २श.दीनुं . ३श. *, ४श. दिप. ५ ग.संक्षा.श * ६ समग्रां ७श. आंधारीं. ८ श. तैसी. ९ श. भ्रांतीची. श.भ्रांतिपटळें, १० श. भूतीं.

इंद्रियें आणीक मन : होति आत्मेयां अधीन
जैसें का जीवन : सूर्यकरां[1] ३०२

दृढावया प्रतीती : नाना दृष्टांतीं
बोलावेया उपपति : सूर्य[2] गुरु ३०३

## ३८

[८] कपोता गुरु. अति स्नेहें सकुटंबी नीमाला, तैसे बोधवंत घरीं आसता आतीं स्नेहे न करूनि त्याग करावा.

परिऐसै[3] नरनाथा ! : तुज सांघैन पक्षिया येकाची कथा
जिया निर्वर्ते[4] संसारव्यथा[5] : गृहस्ताश्रमिची[6] ३०४

जाणतां अतिसेंसीं : स्नेहो[7] न करावा[8] कव्हणेंसीं
कारितां दुखानळु गीवंसी[9] : कपोतेयाचियापरी ३०५

तो कपोता : सहितें[10] कांता
अरणीं होता : बहुत दीस ३०६

तेयां[11] दोघांचें यूगुळें[12] : जैसी अविवेची[13] वज्रशांखळ
नां तरि माहामोहें डंबाळ : आदरिलें तें ३०७

१शा. सुर्योकरांचे. २शा. सुर्यो. ३ग. हसें. शा. °हसैं. ४गशा. नीवर्ते. ५शा. °व्येथा. ६गशा. °मीची ७ ग. स्नेह. ८ ग. करावें. ९ शा. गिवसी. १० गशा. सहितु. ११ शा. तेआ. १२ शा. युगुळ. १३ शा. °रीलें.

तें अहंकाराचें आंदण । किं[1] ममतेचें मेहुण
किं अभिलाषाचें[2] ताराण : मूर्त्त जालें ३०८

कीं त्रृष्णेचें[3] साजणें : लोभाचें नांदणें
किं अवीवेका विसंवणें : जोडलें तें ३०९

तारुण्यांचिया[4] टकमका : भावाचिया चळोबळिका
सर्वांगें एकमेकां : बांधति जालीं ३१०

स्नेहाचें बीरडें : तेयां[5] पडिलें[6] गाढें
म्हणौनि एँक[7] एकापुढें · चाउल न र्घली[8] ३११

ऐंका[9] एकें विण : नाहीं न्हाण जेवण
तयां दोघां एकाचि प्राण : एर काई सांघों ? ३१२

ते जे जे चाड करी : ते तो पुरवी भलेतेयापरी
स्त्रिये अंधीन[10] ये संसारीं : कवण नेव्हे[11] ? ३१३

नवेया तारुण्याचिया वोला : ते उरुके आली फळा
म्हणौनि पहिलेयाचि वेळा : बहुतवीणि जाली ३१४

तयां बाळकाचां मुग्धविळासीं : तियें दोघें जालीं पीशीं
बापे[12] ! अज्ञानाची भुलि कैसी : कव्हणा वोळखवेना ? ३१५

१ श. कीं. २ गश. °खाचें. ३ ग. तृष्णेचें. ४ गश. °चीया. ५ गश. तेयां. ६ श पडलें असें. ७ गश. एकमेकां°. ८ गश. घलीति. ९ श. तयां. १० गश. अधीनु. ११ ग. न्हवे. १२ गश. बाप्पु.

तयांतें प्रतिपाळितां : कुडुकुडा जाला कपोता
हे जगीं कुटंबचींता : कऱ्हणांतें न बधी ! ३१६

कऱ्हणी एकी वेळीं : तिये[1] सांडुनि वनस्थळिं
चारेया निगालीं : तिये दोघें जणें ३१७

तवं पांगितु जाळातें : चिरितु वागुरेतें
पारधी एकु तेथें : एता जाला ३१८

तेथ कुरु[2]वाळा करितें पाखीं झडपितें
कपोतीं खेळतें : देखिलीं तेणें ३१९

मग न वं[3]चतां पाउलीं : न प[4]डतां चाहुलि
जाळ पां[5]गुनि धरीलीं : ए[6]कें वेळें ३२०

कपोता कपोती : चारा घेउनि आलीं मां[7]घौतीं
तवं देखिलीं आक्रंदतीं : बाळकें तियें ३२१

दीठी दीठि मीनली : तवं जिवनकळा उ[8]सासिली
तैसीचि घा[9]गांइलीं : तीयें एकें वेळें ३२२

म्हणति ' आम्ही जा[10]तें असों जमपथा : माघौतीं न यों सर्वथा
सां[11]गातु सरला आतां : आमचा तुमचा ' ३२३

१ गश. ते. २ गश. कढआळा. ३ गश. वजतां. ४ गश. पडती.
५ श. पांगुनिया. ६ श. तीं एके. ७ ग. मागौतीं श. मागुतीं.
८ श. °सली. ९ गश. घाघाइलीं. १० श. जातसों.
११ गश. सांघातू.

तवं आक्रंदत म्हणे पक्षिणि : ' मी कां[1] विसंभेलियें[2] पापिणि
[3]मिंचि जालियें सर्पिणि : यां बाळकांसि ' ३२४

ऐसें बोलैनि अ[4]सासित : पाठीं धाविनेंलीं[5] आक्रंदत
निडळें निडळ घांसत : रिंगाली जाळेयांतु[6] ३२५

तवं विहंगमु करी दुखातें : म्हणे ' सांडुनि मातें
कां जात कांते ! : एकली तुं ? ३२६

न बोलत मासीं : जात असे बाळकेंसीं
लेकरूवें[7] वांचौनि स्त्रियांसि : कव्हणी पढिए ना ! ३२७

आतां सुनिये घरीं : एकला मी कांई[8] करीं ?
कटकटा सदासीवा ! संसारीं : मज काई[9] केलें ! ' ३२८

ऐसे बोलौनि सहसा : जाळेयांतु[6] रीगे आपैसा
बापु ! मोहाचा पासा : कवणांतें न बधी ? ३२९

तियें लाहुनि पक्षिकुळें : व्याधाचें मन संतोषलें[10]
मग बांधौनि जाळें : निगाला तो ३३०

सकुटंबी कपोता : निमाला स्नेहो कारितां
म्हणौनि घरीं असकतां : एंदु[11] ! न व्हावें तुवां ३३१

१ श. कैची. २ गश. °बलियें. ३ श. मीचि. ४ गश. °सीत.
५ ग. धावीं°. श. धावी°. ६ ग. जाळेया आंतु. ७ श. लेकुरुवें.
८ ग. हे°. श. ये. ९ गश. काइ. १० गश. संतोखलें. ११ श. मदु.

## ३९

[ ९ ] आरु गुरू. जेतुकें मीळे तेतुकेनीचि गमावें भणौनि.

सुरसु विरसु आहारु : न म्हणे साना थोरु
जैसा कां आरु : संतोषियो[1] ३३२

जें अदृष्टवशें : मिळे अनायासें
तेणेंचि संतोषें[2] : धाला असे ३३३

न मीळतां आहारीं : कहीं वोसि न धरी
निश्चिंत[3] निर्व्यापारी : होउनि असे ३३४

तैसा असे सयमु : अनुष्ठावेया[4] धर्मु
देहीं सत्वक्षेमु[5] : आरु जैसा ३३५

## ४०

[ १० ] उदधी गुरु. ( मर्यादा न लंघी
आन लाभालाभीं हरिखु विषाद नाहीं यदर्थी )

मियां आपुलियो[6] बुद्धी[7] : गुरु केला उदधी
परमार्थ सीद्धी[8] : लागि राया ! ३३६

१ गश. संतोखिया. २ गश. संतोसें. ३ गश. नीश्चंतु.
४ गश. अनुष्टा°. ५ ग. सत्वें ६ श. °लेया. ७ गश. बुधी.
८ गश. °सीधी.

माहानदीचां वोघीं : स[1]मुद्र मर्यादा न लंघी
न वरु[2]षेतां मेघीं : वोहटेना ३३७

नारा[3]यणें आगाधु : जैसा कां क्षिरसींधु[4]
तैसा होआवा ब्रह्मवीदु : परमेश्वरीं[5] ३३८

जो प[6]रमेश्वराभिमुखु : जया दैवसवा संतोषु[7]
ना[8]हिं विषादें[9] हेरुषु[10] : लाभालाभीं ३३९

## ४१

[ ११ ] पतंग गुरु. स्त्रीरूपही न पाहावें भणौनि. स्त्रीयांचेनि दर्शनमात्रें पुरुष माजौनि विकारा आभिमुखतेसि ये.

अन्यथा–ज्ञानालागि : वारि घालिजे पतंगीं
आगीचिया झीगिमीगीं[11] : देखौनिया ३४०

भोगावेयालागि : जा[12]ळु पाखीं आं[13]ळंगी
तो चडफडीतु वेगीं : मरण पावे ३४१

तैसें स्त्रिएचें रुपडें : तारुण्याचेनि धुमाडें
देखौनि भुररें चढें : विकाराचें ३४२

१ ग. समुद्र. २गश. वरीखतां. ३गश. नारायेणें. ४ गश. क्षीर°. ५ गश. परमेश्वरें. ६ गश. इश्वरा°. ७ गश. संवाखु. ८गश. नाहीं. ९गश. वखािदु. १०ग. हरीखु. ११गश. जीगिमीगी. १२ श. जाळ. १३ गश. अळिंगी.

विषय[1] त्रिमीरि रजें : उरीं आदळलें न सुजे
हात पैरिवसेया[2] नेणिजे : आपेंपरु ३४३

कटाक्षाची मेहलनी : पडे अंतःकरणीं
मावळे दीवेलावाणि : विचाराची ४४४

हावभावाचेनि वैरदळे[3] : बुद्धिचा[4] विचारु[5] मावळे
निद्रा समो तीये वेळे : होए सत्वासि[6] ३४५

म्हणौनि स्त्रियांचिया संगती : नाहीं[7] उर्द्ध[8] गति
न पारुषे[9] संश्रृति[10] : येणें जाणें ३४६

तैसा स्त्रियांचा संगु : करितां पुरुषा[11] होए सत्वा भंगु
ये अर्थी पतंगु : केला गुरु ३४७

## ४२

[ १२ ] मधुकर गुरु. भिक्षा करीतां लागे तेंचि
मागावें आन अडनही पडों नेदावी यर्थी

माधुक्रिया[12] वृत्ती : वर्त्तावे यती
एकि भिक्षा विरक्ती : नाशु होए ३४८

१ गश. विखय त्रीमिर. २ गश. °वसिया. ३ श. वरींदळे. ४ गश. बुधीचा. ५ गश. वीकासु. ६ ग. °हानि. ७ ग. पुरुखा नाहीं. ८ गश. टर्ध. ९ ग. पारुखे श. पुरुखे. १० ग. सहंश्रृति. ११ ग. पुरुखा. १२ ग. मधुक्र्या. श. °क्र्या.

जाणों नेदी योग्यता : ग्रेहीं[1] हात बोळावन केरितां[2]
आहार पर्याप्ते[3] : अटन करी ३४९

सानें थोर न निवडी : ग्रहियां[4] उपखा न पडी
पडों नेदी सांकडि · सुमनासि ३५०

ऐसा निराभिळांषु[5] : सांडुनि रागद्वेषु
जया अदृष्टवशें संतोषु : यदृच्छालाभें ३५१

मेळावितां कणु कणु : उपजों नेदी सीणु
ये अर्थी जाणु[6] : मधुकरु जैसा ३५२

आँणिकु[7] घेवों जाणे अमोदु : जैसा कां षटुपर्दु[8]
उपजों नेदी खेदु : कव्हणें आंगें ३५३

तैसें वेदविद्याशास्त्रमथीत : जाणे सकळ सिध्दांत[9]
जया सर्वज्ञता : ब्रह्मविदां[10] ३५४

म्हणौनि मधुकरू : मिर्यां[11] केला गुरु
तो सांघितला प्रकारु : राजतिळकें[12] ! ३५५

१ ग. ग्रहीं. श. प्रहीया. २ श. * ३ गश परियाप्त. ४ गश. ग्रहीं. ५ गश. ॅखु ६ गश. जाण. ७ गश. आनीक. ८ गश. खटपदु. ९ ग. सीधांता. श. सीधांत. १० गश. ब्रह्मवीद्या. ११ गश. मीयां. १२ गश. टीळका.

## ४३

[ १३ ] गज गुरु. हस्तनीचेन आंगमेळें गज गेला, तैसें पुरुषें स्त्रियेचें दर्शन स्पर्शन संभाषण ही न करावें.

आईकैं राजशिरो[1]मणी ! : योगियें वर्जावी रमणी
येऱ्हवीं हेतु होइ मरणीं : गजाचियो[2] परी ३५६

हस्तिणिचेनि आंगमेळें : गजासि बंधन पातलें
तेव्हळि तें रहस्य जाणितलें : मियां तया पासौनि ३५७

तया शौर्येसीं तटु : बळेंसीं हटु
जगीं अदटु : गजराजु तो ३५८

तो जुझा रांगडे : पाइं भारशांखळें[3] काटे
तो हिकराणिये पडे : तारि घाओ न धरी ३५९

तैसा प्रमदाचा भडखंबा : पुतळियेचेनि[4] मिसें कीजे उभा
तो हि खोंची जिवाचा[5] गाभा : देखतखेवो[6] ३६०

तें देखतां स्त्रिरूप[7] साचोकारें : कवणा विषयवेगु[8] संवरे[9] ?
कंदर्पाचेणि हाथियेरें : कवण ठाके नां ? ३६१

१ गश. सांरो°. २ गश. °चीया. ३ गश सांखळ.
४ ग. पुतळीचेनि श पुतळी.° ५ गश जावाची. ६ गश. खेओ°.
७ गश. स्त्री.° ८ ग. वीखय. ९ ग. आवरे

दावी तारुण्याचा उमाळा : घाली रूपाचा उधळा
मनीं रीगौणि[1] जिवनकळा[2] : घेउनि जाये ३६२

देखे वनितेचें रूपडें : कामाचा[3] अपस्मारु चढे
सर्वेंचि खुरखुरितुं[4] पडे : नरकाग्नि आंतु ३६३

देउनि आंगाचा मेळु : आडा ये ब्रह्मविद्येचा कोळु
भडखळीं राहुनि घे आदळु : विचारेंसीं[5] ३६४

अणियाळिया दीठी : ते मुनी—मनातें खांबाटी
अवकळा कैरी[6] सेवटीं : विडंबौनि[7] जाय ३६५

नाव तारि संन्यासी : तेवीचि स्त्रि[8] असे आंगेंसी
आणीकें[9] विडंबेना[10] कौइसी[11] : वित्तें[12]रोगासि ? ३६६

म्हणौनि राया ! : हें जन्म जावों नेदीं वाया
सांडुनि स्त्रि[13]रूप माया : मीं असें आत्मबोधीं ३६७

१ श. रीघौणि. २ गश. जीवन.° ३ गश. तरि कामाचा. ४ गश. °रितु. ५ गश. वीचा.° ६ श. करुनि. ७ गश. वीटंबुनि. ८ ग. स्त्री. श. अस्त्री. ९ ग. आणीकी. श. हे. १० गश. वीट°. ११ ग. कैसी. १२ श. वीत.° १३ गश. स्त्री.°

४४

[१४] मधुवा गुरु. प्रयत्नेंकरूनी आलंबनही न करावें.

करूनि आयासु : मासिया मेळवीति रसु
तेणें संग्रहें होए[1] नाशु : देहा सकट ३६८
तैसें मन स्मरणीं दक्ष : नव्हे संग्रहिंचि लक्ष
म्हणौनि फळा न ये मोक्षु[2] : साधन तयां[3] ३६९

४५

[१५] कृष्णसार गुरु. श्रवणेंद्रियें गीतध्वनी मेला, तैसा पुरुष श्रवणाविषयीं धर्मापासौनि जाय भणौनि गीत नाइकावें

पारधिया गोरि गातां : हरीणु लुब्धु[4] होए गिता
तवं आंगा घडे अवचीता : मागिली कडे ३७०
पानखड फेडितां वाफडे : मरणा भेण चौकडे
भेणें[6] तयांचेनि पाडें : सावज नाहीं ३७१
सरीं वीगुंतलें चीत्त : म्हणौनि मुकला जिवितां
विषो[9] नांहीं मारिता : तेणें पाडें ३७२

१ गशाद. होय. २ गद. मोक्ष. ३ गद. तेया.
४ गशाद. लबुधु. ५ गश. पडितां. ६ ग. भेडतेया.
७ द तेया ८ गश. जीवीता. ९ गश. वीखो. १० श. नव्हे.

म्हणौनि गीतध्वनि : यती नाइकावा[1] कानीं
रज संचारें पुरुषा[2] हानि : होए सत्वासि[3] ३७३

## ४६

[ १६ ] मीन गुरु. रसही ना सेवावा

मीनु धांवे आविसा : तो गळीं पोविला जैसा
मृत्यु पावे तैसा : रससंबंधें ३७४

तैसा रसु सेवितां भिक्षु : स्मरणीं नव्हे[4] दक्षु
गोडी घेतां मोक्षु : दुरावे तयों[5] ३७५

## ४७

[ १७ ] पिंगळा गुरु. ते चेतनपदार्थ संबंधें विकरली पर मागुती उपरत घेउनि अनुतापलीं, तैसा पदार्थ वस्तुबिचार करुनि विटंबिजे आन गुणा प्रवर्तीजे

## ( १ )

आईकें[9] राजशिरोमणी ! : पींगळा म्हणीपैं[6] सामान्य रमणी
ते विदेहाचां पाटणीं : पुर्वी असती[7] जाली ३७६

तीये जवळा : मि काहिं एक सिर्खिलां[8]
तें आंइक भुपाळा ! : अवधान देउनि ३७७

१ गदृशा. नाइकावी. २ ग. पुरुखा. ३ गशा. सत्वाची.
४ दशा. न्हवे. ५ गद' तेया. ६ दृशा.'पे. ७ शा. वसती.
८ दृ. सिकलां. ९ गदृशा. आइकें.

( २ )

एक वेळ ते पण्यांगना : कांताचियां[1] कामना
कर्‍हनि शृंघार-रचना : बैसली बाळाणेनसीं ३७८

तिये कामिनि[2]-हाटीं : ए जाय विळासियांची दाटि
पारि तीयेची[3] वास सेवटीं : कव्हणी[4] पाहेचि ना ३७९

तेव्हळि ते कांता : म्हणे ' यातें संसारा नाहीं पुरतों[5]
म्हणौनि आनौर्ते[6] पांत : निगाले[7] हे ३८०

हा पैलु घोडेकारु : फुडा होए मोलकरु
म्हणौनि मज समोरु : येणें डोळा लाविला ' ३८१

तोहि निगे परता : तेव्हळि ते करी चींता
म्हणे ' आजि कव्हणीहि[4] एउता : कां पां एचि ना ? ' ३८२

वायांचि उठी बैसे : गाय वाय आपैसें
बापु ! द्रव्याचें पीसें[8] : काइ एकें[9] न करवी ? ३८३

गोरुं खडपंडी[10] बाहिरि : तरि म्हणे कवणाचें घोडें गे[11] ! द्वारीं ?
जाइलीं सुनी देखे आंधारीं : तरि म्हणे हडपु कवणाचा ? ३८४

१ गश्र्यद. °चीया. २ ग. कामिनोएचां. ३ गद्दश. तियची.
४ दश. कवण्ही. ५ श. नीरुता. ६ श. आणुतें. ७ श. नीगाळा हा.
८ द. पिसें. ९ श. * १० ग. °फडी. ११ द *.

आंगणीं सोरु घुरुधुरी[1] : तरि म्हणे येथ कवण गे ! खांकरी ?
हा आशा-बंधु संसारीं : कवणांतें भोंडावी[2] ना ? ३८५
आंतु बाहीरि ये जाये : काईसेनहिं निद्रा नैं[3] ये
ऐसेया परी गेली तिये : मध्यम रात्रि ३८६

( ३ )

तेव्हाळिं पैं एदु ! : तिये उपनला निर्वेदु
जेणें तुटे अज्ञान-कंदु : या संसाराचा ३८७
मग म्हणे ते पींगळा : ' मज कैसा पडिला मोहाचा उधळा
जो आनंदाचा पुतळा : कांतु मीं कैंरींचि[4] ना ३८८
जेणें कामु कामियां : विळासु विळासिया
संभोगु भोगियां : जेणें होये ३८९
जेणें सुख सुखियें[6] : बळ बैंळियें[7]
ज्ञान ज्ञानियें : जयास्तव ३९०
जो रूपें बरवंटु : त्यागें घनवटु
जयातें भोगितां नुंपजे विटु : कैंइपांतींहिं ३९१

१ श. गुरुगुरीं. २ ग. भंडावी ३ गद्. नै ये. ४ द्. न करींचि.
५ ग. संभो°. ६ ग. सुखीयं. ७ ग. °यं. ८ ग. ज्ञानीयं.
९ द्श. * १० द्श. नुपजे°.

जो[1] योगियांचा वल्लभु : भक्तांचा सर्वस्व—लाभु
तो अच्युतें[2] स्वयंभु : प्राणेश्वरु माझा ३९२

तो सांडुनि[3] सुखसागरू : मी पति वरीतें[4] असें गंवारू
जयाचेया आंगें[5]—उबा विटे[6] शृंघारु : कामिनी-जनाचा ३९३

( ४ )

हाडांची मोळी : कांतु[8] म्हणौनि पोटळीं
बाप ! विषयांची भुलि : काई एक न करवी ?

हातापायांचा[9] मोळा : अम्यध्यासि[10] पडिला
तया नाव ठेविलों[11] : नेरु[12] ऐसें ३९५

हे घामाची खांदवखाल : श्लेष्मेयांची चीखल[13]वोहोळ
आंपानाची[13] धुर्म[14]सोळे[15] : शरीर हें ३९६

हें सर्व रोगांचें भांडवल : दुर्गंधिचें प्रथमस्छळ
लोवेचें[16] बांबळ : पाल्हेलें हें ३९७

१ श. तो. २ गदश. अच्युतु. ३ श. सांडौनि. ४ श. वरीतसें. द. वरितेंम्रें. ५ श आंगौबा. द आंगा° ६ द. उबविटें. गश. वीटे. ७ ग. °मी. ८ ग. *. ९ गश हाथा°. १० गश. अमेध्यासि. द. अमेद्यासी. ११ द. ठेविलें १२ ग. जगीं नह ऐसा. १३ द. चिखल.° १३ गश. अपा°. १४ गदश. धुम°. १५ गदश. स्थळ. १६ गदश. लोमवे

हें मुळमुत्राचें भांडें : म्हणौनि ठाकों न[1] ये यें[2] निर्डें
शिव ! शिव !! यांचेनि[3] पाडें : आणिक कस्मळ नाहिं ३९८

याचा भितरुं[4] : न साहे निहारुं[5]
करूं न ये विचारु : या कळेवराचा ३९९

मज्जेचा आळां : रुधिराचिया वोलों[6]
मेद-मांसाचा कीजे काला : सरिसेनि पाडें ४००

तयाची लाह्यानवती : मळिजे वींतपीती[7]
मग श्लेष्मेनि[8] पुडतीं : कालविजे ते ४०१

तिया मातिया आटा : लींपौनि अस्तिचा[9] साटा
मीळौनि[10] शिरीं[11] येकवटा : मग बांधिजे तो ४०२

वोढुनि[12] वोलें चांबडें : बोखारिंजे चहुंकडे
तैया[13] पुरुषाचें रुपडें : ऐसें नाव ठेविजे ४०३

रिंगौनि तयापुढें : मीं जोडीं कवडे
ये मोलाचिये चाडे : कांई[14] न किजे[15] ? ४०४

कृत्याकृत्य कीजे : मग हा आत्मा प्रतिपाळिजे
तोहि वीकुनि जींजे : या परतें पाप नाहिं ४०५

१ गद. नै ये. २ द. यया. ३ द. येणें. ४ दश. भीतरू. ५ गश. नीह्मरू. ६ द. ऊला. ७ द. पित्ति. ८ श श्लेस्मया. ९ गदश. अस्तीचा. १० गदश मेळौनि. ११ गदश. सीरा. १२ द. ऊ.वो. १३ गदश. तेया. १४ श. काइ यक. १५. गदश. कीजे.

ये मीथळेचां हाटीं : शरीराची करुनि सींगवटी
 जीये ऐसी वोखटी : दोहिं वोळीं[1] मीचि एकि ४०६

( ५ )

आतां जेळो[2] जळो हें जीयालें : ईतुलें[3] जन्म वांयांचि गेलें
 आँयुष्याचें[4] कडलेख[5] उरले : तें तऱ्हीं परमेश्वरासि[6] देवों[7] ४०७

विषयांचिया धावड [8]होडी : गेलिया जन्माचिया कोडी
 पारि परमेश्वरसेवा[6] एकि घडी : होवेंवोचि[9] ना ४०८

आतां सर्वस्व सांडिजे : हें जन्म परमेश्वरा[6] देईजे
 मग काई होईल तें पाहिजे : यणें [10]शरीरें ४०९

( ६ )

याचिया अवस्था : विषय भोगु सांडिजे सर्वथा
 साहिजे आंगव्यथा : देहदमनाची ४१०

ऐसेयां[11] चर्या[12] पवीत्रा : करावें शरीर–यंत्र
 मग होईल प्रेमपात्र : तो चैतन्य–नाथु ४११

आतां जातिकुळ सांडुनियां : याचें घर रीगों[13] बळियां
 हा परमेश्वरें[6] एकु वांचुणियां : कवण रक्षता असे ?' ४१२

१ द.बोलीं. २ गदशा. * ३ द.येतुलें. ग.आवघे ४ग. °क्षाचें.
५ शा.कढि°. ६गदशा.इश्वर°. ७द.देऊं. शा.देओं. ८ग.द.°हुडी
९ गद. होयाचि. १० शा °रेंसीं. ११ ग. ऐसीया. द. ऐसिया.
१२ द. परीया. १३ शा रीघों.

ऐसि विषयं-रम्यता विचारिली : तवं कांतासा नीवर्त्तली
मग सेजे रीगाली : पींगळा ते ४१३

म्हणौनि भुपाळा ! : खांडुनि आशेचिया शांखळीं
मीं असें मोकळा : निराश्रयीं वनांतु ४१४

## ४८

ऋषीशृंग गुरु भणौनि स्त्रियांच दर्शन.
आलाप चुकवावें, परि हा कोमळ.

(१)

परियेसैं नृपचक्रवती ! : ' वनिता-गितु नाईकावा यंती
आईकिलेयां भुलि पडे चित्तीं : ऋषीशृंगाचिया परी ' ४१५

(२)

तवं राओ म्हणे ' अवधुता ! : ऐसी कवणि ते कांता
जियीं वीभांडकाचिया सुता : भूलि उपजवीली ? ४१६

कैसा वित्तरांगु : आइकिजे ऋषीशृंगु
तयासि जाला सत्वासि भंगु : सांघैं कवणी परी ? ४१७

१ ग. विखय॰. २ गद.कांताशा ३ दश. साखळा.४ गश.नैरास्य. द. निरास्य. ५ दश. ॰हसैं. ६ दश. ॰वर्त्ती ७ श. इती. ८ गद. ॰लीयां. ९ द. नेया.१० दश. ॰चेया. ११ गदश.बीत॰ १२ गद . *

जयाचां हृदय–पटीं : वनिता-विळासाचें बिंब नुठी
तो धावे स्त्रियां पाठीं : ऐसें केवि घडे ? ' ४१८

( ३ )

तवं म्हणे अवधुतु : ' तो तुज सांघैन वृत्तांतु
जेणें बांधला मृगि–सुतु : प्रमदाजनीं ४१९

राया दशरथाचां देशीं : बरग पडिलें[1] कव्हणी[2] एकी वरुषीं[3]
तै मुळ पाठविलें ऋषीश्रृंगासि : वधुजनांतें ४२०

तयां माजि[4] पात्रकळिका : ते उत्तम नायेका
कंदर्पाचेया मारांका : गोसावीणि ते ४२१

ते कामतत्विंची[5] कुळदेवता : किं लावण्य–वनिची कल्पलता
नां ते मूर्त जाली संगिता[6] : चंद्रकीरणींची[7] ४२२

नां ते मदन–यक्षीणि मातावळी :[8] किं श्रृंघारकोल्हैरिची[9] माहाकाळी
[8] किं वसंत-चंपकाची फुलली . गंधफुल्लिते[10] ४२३

( ४ )

ते सखिजनींसीं : निगाली वैराग्य–वनासि
तेथ असे तपोरासी : ऋषीश्रृंगु[11] ४२४

१ गदश. जालें. २ द. कवण्ही. ३ ग. वरुखी. द. वरीसि. श. वरुसी. ४ गद °माझि. ५ गदश. °तत्वाची. ६ गदश. संगीता. ७ गद. किरणाची. श. °कीर्णाची. ८ गश. कीं. ९ श. श्रींघार°. ग. °कोलौरीची. १० गश. फुली. ११ गश. °तो.

अनंगाचें गणचक्र उठावलें : किं सुख[1]सागराचें जौळ लोटलें
तैसें घसरें चालिलें : कामीनी—सैन्य ४२५

( ५ )

मळयानीळु मागाडा : दाखवी चुततरूचा मांदाडा
तेथ मोकली पुढां : रीतु-राओ[2] ४२६

केतकीदळें निगळें : कामैानि परिमळें
टेंकें[3] देउनि सेइलें : वसंतें तेथ ४२७

चंद्राचेनि सरवेंदे[4] बळें : तेणें रीतु—रायें वाईलें
तवं हातें[5] कालवलें : तयाँ[6] तपोवनांतु ४२८

काम-क्रिडा रसाळें : खेळति पैंक्षिकुळें[7]
झाडां उपजति डोहळे : कामिणियांचे ४२९

झांजरलीं[8] पंचबाणें : एकमेकांवारि पडति हरिणें
तया कुसुमाकराचेनि ताराणें : कवण[9] ठाके ना ? ४३०

अनुरागाचां समरंगणीं : तै झुंझती[10] तरुणी
घायेवंटीं[11] पडति [12]हरिणी : पल्लवसेजावरीं ४३१

१ गदश. °रसाचें. २ दश. रा ओ. ३ दश. टेकु. ४ गदश. सर्व°.
५ गश. हार्ये. ६ गद. तेया. ७ गदश पक्ष°.
८ गश. झाझरलीं. ग. °रीली. ९ गदश. कवणु.
१० दश. झुझति. ११ श. घायवट. १२ गदश. विरहिणी.

कमळवनिचां घाटीं : अनंगाचें रण उठी
कामीनी—कबंध[1] लागति पाठीं : मुनीजनासि ४३२

कुसुम—कळिकांचें भुरुरें : मुनि योगियांचें सर्वस्व हीरे
तै कंदर्पाचा उठावा धेरे : ऐसा कवणु असे ? ४३३

वसंताची[2] नायकवडी : खोचीति[3] कोकिळांची धाडि
मग करीति उलींगवाडी : ते[4] तपोवनीं ४३४

परिमळाचे उपलाणें : घालीति वित्तेरागां[5] घालणें
सुत जडेचीं वोडणें[6] : पळति तपोधन ४३५

मळयानिळाचे उखरडे : आसुडीति वैराग्याचीं दींडें
मकरंदाचीं धोंदवडें[7] : नागवीति सयमातें ४३६

परागाचा धुळिरा : धुधुळिया मधुकरा
आझोडितां विचारा : आंधौडि[8] जाली[9] ४३७

ऐसी वसंत वाहार : तीये वनीं जाली थोर
मग मृगी—सुताचे जुझार : वांति[10] कामिनी जेंन[11] ४३८

१ गश. कबंधें. २ गदश. °चीया. ३ गदश खांचीति.
४ गदश. तिय. ५ गदश. वीत°. ६ द. उम्हनें. ७ गश. धोंध°.
८ गदश. आधोलि. ९ श. केली. १० गद. वांति. ११ गद. जता.

( ६ )

तो धरूनि हीरवा : ऋ[1]षीशृंगु रायापुढें सुआवा
म्हणौनि पात्रकळिका के[2]वणी टेवा : जुझती जाली ? ४३९

कुसुमा[3]भरणाचेनि मिषें : बांधे भारदोरिया कसे
यक्षकर्दमें डवरी सरिसें : आंग—दुर्ग ४४०

चुचुकाचिया च[4]र्या : उमिलिया बकुळ—सारियांचिया गुढिया
झळंबति पालव—सातिया : पाखेयांचिया ४४१

झाडुनि जंघनां[5]चे कडे : पानासिले नितंबाचे हुडे
ब[6]हिरवढे कुळिया चहुंकडे : मेखळा मणीचिया ४४२

साजुनि सीमंतकाचें चवरें : बांधलें के[7]तकीदळाचे बांधारे
वारि शस्त्रास्त्रें अपारें : पंचबाणाचीं ४४३

कांकणांचां कळरवीं : ते धैर्य[8] धडकु निसाणु लावी
रणभा[9]सुरें तुरें सुडावी : कळ—नेपुरांचीं ४४४

ते रतिरायांचें मारांक कासी : तरि कवणु विषय—विरु हातवसी ?
ऐ[10]कांकी घाडी सरिसी : ऐसा कवणु असे ? ४४५

१ग. ऋष्य°. १ श. कोणि. ३ ग. कुसुमभर°. श. भराचेणि. द. कुसुमु° . ४ दश. चरीया. ५ दश. जघनाचे. ६ द. °वाडे. ७ श. केतकीचे. ८ श. धैर्या. ९ गदश. भयासुरें. १० श. एकाएकी.

( ७ )

मग आळतिचा उपलाणां : खोंचनों केली आंगत्रणा
पुणु ऋषीश्रृंगु ध्यानसींहासना : वेरुनि[1] ढळेचिना ४४६

तेह्वळि[2] शरीराचां सरांटीं : ठीकाळला चैतन्यपुटीं
मग चाचरीं जातु उठी : ऋषीश्रृंगु तो ४४७

तैसाचि घैर्यें[3] मातला : तवकें असासीतुं[4] निगाला
तवं पुढां दळभारु देखिलों[5] : तापसांचा ४४८

तीहींसीं[6] झींजि लागली : तवं आगंळीचि काळि मातली
मग काई[8] करिती जाली : पात्रकळिका ते ? ४४९

न धरी वोडण[9] खांडें : ने घे भाला खेडें
पुणु नृत्याचेनि कैवाडें : तेह्वळि जुझे ते ४५०

ते रंगीं उभी ठेली : सर्वेचि विचारें लागि केली
तेथ पुढां जुझे पुष्पांजुळि : खेवंगीं मनैंकटाचां[10] ४५१

तेरा आंगतुकाचिया चळबळा : झाडि[11] करीतें[12] असे वीवेकदळां
पदें[13] उघडितां मोडी उमाळा : माहातपांचां[14] ४५२

१ दशा. वरौनि. २ गदशा, तेव्हाळि. ३ द. घाई ४ द. आसासितु. ५ दशा. चालिला. ६ गदशा. ते°. ७ शा. अधिकाचि. ८ शा. काय. ९ ओडण. १० दशा. मणि°. ११ शा. झाडणी. १२ गद. करीतसे. १३ द. पद. १४ गद. महा°.

अभीन्नवी[1] सत्तीस दृष्टी : तरि सर्वांगें[2] घेउनि आटी
लागती कटाक्ष—सर्पाचिया पुटी : कळहारिये जिवाचिये ४५३

ते पात्रां राओ पाता गुरू : दावी हस्तकांचा विवरू
तेथ जिह्वारीं खोंचे कुमरु : विभांडकाचा ४५४

पताकाचिया वोडणीं[3] : ते धैर्यातें हाणे चडकणा
त्रिपताकाचीया खुणा : अंकुडां[4] घाली चैतन्यासि ४५५

करी षटुकामुखु[5] : तरि मनोदंडु तोडी निलखु[6]
जिह्वारीं खोंवी सुचिमुखु : हारिणी-सुताचां ४५६

मृगीसुरु[7] आरळु : प्रबोधेंसीं घेति आदळु
मुष्टिकु करीं जगबोळु : वित्तरागांसि ४५७

संयतें[9]-हस्तकाचेनि मिषें : आठां आंगांचा हुडा नचितु[10] असे
हंसपक्षी[11] नितंबकु ऐसे : भेद सांघतां कथा ठाकैल ४५८

देतां-छत्र भवरीं अलंग[12]-भवरी : मुनीमनाचा चौकवरा[13] करीं
मोटका कोळासीं[14] सीतकारी : तरि लोळवी मुरुकुंडितें[15] ४५९

१ गदशा. अभिनत्री. २ द. सर्वांग. शा. सर्वांगीं. ३ गदशा. °वना. ४ द. अंकुडा. ५ गदशा खट्° ६ द. निलेखु. ७ ग. °शिरु. द. मृगशिरु. ८ शा. वीत°. ९ गद. संयुत. १० गशा. जुझतुसे. द जुझतसे. ११ गद. हंसुपक्षु. शा. °पक्षु. १२ ग. अलंग. द. अळग, १३ गदशा. चाकोरा. १४ द. काळा. गशा. कळा. १५ दशा. °कुडी.

सुताळा रूपका : वरि नाचतां पात्रकळिका
ऋषीश्रृंगु-तपाचा यावांका : पुसतु[१] असे ४६०

घन ·सान म्हणतां : आरघोई[२] देतां
आटु भवते[३] असे विरक्तां : तया गजरासवें ४६१

नाचतां धरांचिये[४] जतीः काळासाचां उचीतीं
त्यागु दे नादमुर्त्ती : तीये[५] ऋषीश्रृंगाचा ४६२

एक तळिएचां अभंगीं : राहिली ते तन्वांगी[६]
पुणु झाडाचा नाचु तिये रंगीं : पारुखोचि नां ४६३

(८)

मन्नोरथु[७] पुरला : ऋषीश्रृंगु हातीं[८] लागला
मग मागौती[९] ते अबळा : नगरा येती जाली ४६४

ऋषीश्रृंगा सारिखा : क्रिडा[१०]–कुरंगु केला देखा
यां स्त्रियांसि[११] न ये लेखा · ऐसा कवणु असे ? ४६५

१ ग. पुसत. द. पुसितुसे. श. पुसतुसे. २ दश. °बाई.
३ दश. भवतसे. ग. भवतु. ४ द. धराधराचिये. ५ श. *
६ द. तन्वंगी. ७ गदश. मनो°. ८ गश. हाथीं. ९ श. मागुती.
१० श. क्रीडा°. ११ ग. स्त्रीयां. नैए.

( ९ )

म्हणौनि प्रमदाचें गाणें वाणें : नाइकावें—ध्यान परायणें
तया मूर्त्त मृ[1]त्युसीं साजणें : चित्तरा[2]गांसि ४६६



[ १८ ] कुररु गुरु, पदार्थसंग्रह केलियां हि जाये भणौनि

पक्षिया एकु मासा : घेउनि जाय आकाशा
पाठीं लागु पावे सारिसा : पाखिरुवांचा ४६७

तो झडपुनि पाखीं : विदारिली नो[3]खीं
घाय सुतां मुखीं : विकळु गेला ४६८

भेण आवींस सांडी : तयावरि पडे पाखिरुवांची कौ[4]ळवंडी
तो निरामी[5]षें होउनि एकी झाडीं : सुखिया जाला ४६९

म्हणौनि रानींवनीं : असावें निःकं[6]चनी
देहमात्र उँ[7]रौनि : उपाधि—त्यागें ४७०

१ श. मृत्यासि. ग. मृत्यूसीं. २ गदश. वीत° ३ श. नाखिं.
४ श. °वडि. ५ गद. °मुखु. श. मुख. ६ श. नीष्क°.
द. निष्कीं° ७ गश. उरउनि.

## ५०

[ १९ ] बाळ गुरु. विकार विकल्पा वेगळें असावें

संकल्प विकल्प[१] बाळा : नाहीं पुण्य पापमळ
कर्म कारीतां फळा : नव्हे अधिकारी[२] ४७१

नाहीं मानाभिमान[३] : न म्हणे उत्तम हीन
सुचि[४] असुचि हे विवंचना[५] : करूं नेणे ४७२

लबधु नव्हे गीतां[६] : नाहीं कुटंब चींत[७]
वेवहारा वित्तां : साक्षि न ठके ४७३

विकाराचा विटाळु : न पडे इंद्रियांचा सळु
ये अर्थी बाळु : मिया केला गुरु ४७४

## ५१

[ २० ] कुमारी गुरु. बहुतांचां मेळीं नसून एकाकी असावें

ब्राह्मणाची[८] कुमारि : ते उपवर नोवरी
कन्यार्थी अवसरीं[९] : पाहों आले ४७५

१ ग. वीकल्प. २ ग. °कार्या. ३ गद. °पमान. श. °पमानु.
४ द. शुचि. ५ द. वीवंचना. ६ द. वित्ता. गश. वीता.
७ गश. चीत. द. चित्त. ८ ग. ब्राह्मणा एकाची. ९ श. तीय अवस्वरीं.

घरीचियां सांकडी : मायबापां बाहीरि हिंडी
म्हणौनि नोवरीचि पाटपीढीं : बैसों घाली ४७६

तेथ बैसले वऱ्हाडी : नोवरी स[1]रूपें उदंडी
[2]तियेचिये सिह्माणिवेची रूढि : मानली तयां ४७७

जाणौनि आपला पतिकरु : तया करावयां पाहुणरू
करूं आदरिला व्यापारु : घरा आंतु ४७८

तांदुळ करावियाँ[3] साळी : तिये कांडितां उखळीं
आघातीं शंखाचीं[4] वळीं : वाजतीं जालीं ४७९

तेव्हाळि[5] लाजली जीवीं : मग ऐकेक[6] पींचवी
दो दो उरवी : तऱ्हीं ध्वनि न पारुखे[7] ४८०

तेव्हेळि[5] ऐकेक[6] भंगी : ऐकेक[6] उरवी ते तन्वंगी
मग ठाकलीं उगीं : न वजतिचि ४८१

बहुतांचां मेळीं : एकमेकेंसीं[8] उपजे कळि
दोघां असतां जवळि : गोष्टि घडे ४८२

संसार-त्रस्तु अनुतापी : जो एकला जन्म क्षेपी
तो मोक्षाचा निक्षेपीं : संपन्नु[9] होए ४८३

१ शाद. सरूप. ग. स्वरूप. २ शा. परि°. ३ गदृशा. °वेया.
४ दृशा. संखाची. ५ दृशा. तेव्हळि. ६ ग एक एक. ७ शा. परुखे.
८ शा. एकमेकां. ९ ग. संपन्नु. दृ. संपन्नु.

म्हणौनि एकाकिता निसंगीं : साधावी वीतरागीं
गुरुत्व ए प्रसंगीं : कुमारिचें[1] ४८४

## ५२

[२१] सेलारा गुरु. शयनासनभोजनीं स्मरणीं लक्ष न संडावें.

सेलारा गुरु : केला उजारितां[2] सरू
नेणेचि रावो[3] सपरिवारू : द्वारें जातु[4] ४८५
चति वीगुत्तलें सरे : म्हणौनि दुजें न स्फुरे
तयाहि निपोटारे[5] : काई इश्वरु[6]—स्मरण ४८६
म्हणौनि शयनासनभोजनीं : परमेश्वरु स्मरावा मनि
लक्ष न खंडावें मुनी : सेलारेयाचेया परी ४८७

## ५३

[२२] सर्प गुरु. आइता स्थानीं असावें

आपुला आहारु : जाणो नेदी व्यवहारु
ये अर्थी सर्पु गुरु : मियां केला ४८८

१ श. कौमा°. २ दश. °रीतां. ३ द. राउ० श. राभो.
४ ग. जातां. ५ ग. नीपूठारें. द. निपुटारें. ६ श. इस्वर.
द. ईश्वर. ६ द. °याच्या.

जळांतु शोधौनि[1] गाडौरे : लोक राचिति मंदरें[2]
केह्वळि जाति शरीरें : हें जाणति ना ४८९

पाक्षिये [3]कैरांति [4]अविंसाळे : वोळींबे वावरुळें
मुखक करीति बीळें : बहुतें कष्टें ४९०

मुंगिया रचींति धवें : खोपा सावजें [5]सर्वें
ऐसे [6]व्यापारताति [7]आघवे : जिवीत देउनि ४९१

[8]ग्रहारंभा लागि : हींसा आंगविजे जगीं
आइतां रीगिजे भुजंगीं : न व्यापारतां ४९२

तैसें माहात्मा वृक्षमुळीं : असावें खांड देउळीं
तेथ भीये तरि वाटाउवां जवळि : ग्रामप्रांतीं ४९३

आपणपे कव्हणी न [9]लेक्षे : आपण कव्हणातें न देखे
ऐसा असे सुखें : सर्पु जैसा ४९४

१ गद. शोधुनी. २ गबश. मंदिरँ.. ३ श. रचिति.
४ गश. आवीं°. ५ श. सावें. ६ श. रति. ७ गद. आवघे.
८ ग. गृहा°. ९ श. लखे.

## ५४

[ २३ ] कांतीण गुरु. मायेचें सूत्र मानसीक शरीर
. या दोहीं प्रकारीं सृष्टी रची आन संहारी

माया–सुत्राची दोरी : करुनि [1]सृष्टी रची संहारी
कांतिणि [3]जेयापरी : उर्णतंतु ४९५

[2]तियां शक्ती प्रपंचु : जीउ सके रचुं
स्वरूपां[4]चा वेचु : जाला नेणे ४९६

सृष्टीचिये राहाटीं : व[5]रुती नाहीं दृष्टी
आपणपें घालुनि हटीं : भस्मा नेलें ४९७

जी[6]उ माया मीळणी : ये सृष्टीची करणी
म्हणौनि मीयां कांतिणि : गुरु केलीं[7] ४९८

## ५५

[ २४ ] भिंगुरुटी गुरु. भिंगुरटीचिया परी तद्रूपता होय.

भींगुरुटी जेणें अर्थें : मि[8]र्यां गुरु केली येथें
तें [9]परियेसैं वीचार[10]पंथें : निर्धारूनि ४९९

१ **श.** श्रृष्टी. **द.** श्रृष्टां. २ **दगश.** मीयां°. ३ **श.** सेया.
४ **गदश.** सरू°. ५ **गदश.** वरौति. ६ **ग.** जीव. **दश.** जिव.
७ **द.** केला. ८ **गश.** मीयां. ९ **गश.** °हसैं. १० **द** पंथें.

जवळि येउनि किटकी[1] : भींगुरुटी तियेतें डंकी
घरांतु सुनी[2] कवतिकी : लींपौनि सांडी[3] ५००

ते येउनि मांघुती[4] : खाइल मातें निरुती
ऐसें भेण तियेतें चींती : रात्रि देवो[5] ५०१

ऐसें तियेतें चींतितां : कीटकीये जाली सरूपता
तैसें परमेश्वरु स्मरतां : मुक्ती होए ५०२

## ५६

चोविसां गुरुंचा उपसंहारु. मनुष्य देह गुरु.

मियां[6] आपुलि बुंधी[7] परियेसैं[8] : गुरू केले चोविसै
मनुष्य-देहेंसीं पंचविसै : निर्वाळिले ५०३

मनुष्य देह गुरु : तेथिचा उघड विचारु[9]
तो सांघेल कवी भास्करू : श्रोतेयांतें[10] ५०४

## ५७

मनुष्यदेह गुरु हें देह मारीं वैर चाळी अहर्नीसीं

परिएसै[11] महिपाळा ! : कव्हणी न म्हणावा आपुला
ए अर्थी पंचविसावां : गुरु[12] जाला शरीर हें ५०५

१ गश. कीटकी. २ श. सूंने. ३ द. जाय. ४ गदश. माघैति. ५ द. दिसु. गश. देओ. ६ श.मीया. ७ द. मति. ८ गश. °हसैं ९ गश. वीचारु. १० दश. °यांसि. ११ ग. °हसैं. १२ गश. मन गुरु.

हे देह मासीं : वैर चा[1]ळी अहर्निसीं
सर्वचोर लागले आंगेंसीं : ईंद्रियें पैं ५०६

हें मन चोरटें : अनुरागशस्त्रें तीखटें
घोणारीति चोखाटे : मन्मथाचियें ५०७

तारुण्याचीये पा[2]हातपटी : ईंद्रियें घेति विषयांची दा[3]राठी
पापाचा लागु पावे सेव[4]टीं : आत्मेयां वरि ५०८

तया बाधका : नेईजे[5] कुंभिपाका
मग अ[6]नेगी जाचणुका : विचंबिजे हा ५०९

जैसें पा[7]णि पीये घडिवटे : घाओ घालिजे जेंगटे
तेवि ईंद्रियें खाति आदटें : न[8]रक आत्मा भोगी ५१०

माहा पापेंसीं हातखोडा : घालिजे जया[9]चियां चाडा
तो दा[10]राद्य वर्गु वैराडा : एणें आत्मेनसीं ५११

एवढी कु[11]चळाची आटि : काढिजे जया साटिं
तें शरीर ने[12]व्हे सेवटीं : आपुलें पैं ५१२

१ श. वाळी. २ ग. पाहान°. द. पाहांत°. श. पाहाट°. ३ श. दाराटी. ४ गद. पाठीं. ५ गश. नेइजे ६ द. अनेकीं. ७ ग. पाणी. श. पानीऐ ८ दश. आत्मा. नरक. ९ ग. नया°. द नेयाच्या. १० ग. दारादि. ११ श. कुळाचळाची. गद. कुळाचाराचि. १२ श. *

## ५८

### ईश्वरा सोइरा.

म्हणौनिया चराचरा : परमेश्वरु[1] एकु सोयरा
जो राखे घोरंतरां : नरकांपासौनि ५१३

## ५९

### हें मनुष्यदेह दुर्लभ भणौनि त्याग संन्यास करूनि हें जन्म ईश्वरा द्यावें

तरि आतां राया ! : या जिविताचिया लाह्या
हें मनुष्य-देह वायां : तुं जाओं नेदीं ५१४
देशोदेशिं[2] हरिणाचे दडे : परि कस्तुरिया[3] मृगु न जोडे
वनोवनीं चांपेयांचीं झाडें : परि नाहीं पार्यातकु ५१५
घरोघरीं ठीकांचीं लेणीं : परि नाहीं चींतामणि
हाटोहाटीं विकति कांचमणी : परि नाहीं पाची गरुडोद्गार ५१६
झाडोझाडीं फुलें असोसें : परि नाहीं मुक्ताफळांचे घोंसे
गावोगावीं उदकें बहुवसें : परि[4] नाहीं वोघु[5] गगन-गंगेचा ५१७
तैसी संसार-रंगीं करुनि रीगवणी:हा आत्मा घे नाना शरीराची आंगवणी[6]
परि न ल्हाये[7] सुपाणी : मनुष्य देह ५१८

१ गश. ईश्वरु. श. इस्वरु. २ गश. देसोदेसीं. ३ श. कस्तुरीमृग.
४ द्व. परी कें. ५ द. ओघु. ६ द्व. अयं. ७ ग. लाहीजे. द. लाहे.

विपायें कर्मभूमिचीये पेठें[1] : नरदेह लाधलें अवचटें
तरि मुक्ति—रत्न घेयावें[2] गोमटें : जवं मृत्यु पावे[3] ना। ५१९

हा कालु उघडा : जगीं वैराडा
येणेंसीं कांडगुंडा : कव्हणी[4] घे ना ५२०

लपौनि चोर खांचेचां वोहळीं[5] : वळीत—पळिताचें ताडवन[6] घाली
[7]ते देखे ईंद्रियांची हाडाळि : पारि हातियेरु[8] न करी[9] ५२१

हाणौनि तारुण्याचिया केळी : सूंदेर्याचें[10] कोठार जाळी
अवचीतें घालणें घाली : अपमृत्युचें ५२२

घेउणि बळाची परतनी : प्राणा करी खोंचणी
आयुष्याची तोडी तवनि : हळु हळु ५२३

मांहा[11] रोगाचीं[12] नायकवडी : वेढुनि लागि करी[13] चहुकडी
न वचतां अर्धघडी : उत्तरी शरीर—दुर्ग ५२४

मग देहा[14] धवळियां[15] : आंतु रीगौनि[16] बळिया
त्रिणे[17] सूर्या[18] : उसांसी[19] जीवन-कळेतें ५२५

१ द. पेटें. २ श. घेइं. ३ द. न पत्रे. ४ दश. कवण्ही. ५ द. ऊ्हळीं. श. वाहळी. ६ गदश. ताडवन. ७ ग. तो. श. तवं. ८ श. हाथि°. ९ श. धरी. १० गदश सौंद°. ११ द. महा. १२ गश. रोगांचीया नाइक°. १३ श. करितीं. १४ द. दिहा. श. दीहा. १५ गद. धवळेया. १६ गदश. रिगौनियां. १७ द. उसासी विन. १८ दश. सुरीया. १९ द. *

म्हणौनि दडवांदर्डी[1] : तुं [2]रीगैं कैवल्याची पाडि
जवं अवचीती न घली धाडि : कृतांतु हा ' ५२६

६०

रायास नीरूपण करीतां अवधूत नीघाला

पैरियेसैं भक्तशीरोमणि ! : ऐसी आईकौनि अवधुताची वाणी
मग वैराग्य उपनलें अंतः:करणीं : नरनाथाचां ५२७

आर्चिला अभिवंदिला : अवधुतु निगाला
ऐरीकडे काई कारिता जाला : आमचा पुर्वजु तो ! ५२८

६१

यदूचा त्याग, निःसगता

करूनि सकळांचा त्यागु : तो जाला निसंगु
मग पातला योगु : परब्रह्मेंसीं ५२९

६२

ऐसा त्याग करूनि ब्रह्मविद्येची जीज्ञासा करावी

म्हणौनि त्यागांजन निर्मळ : सूनि तुं[6] फेडीं प्रवृत्तिचें पटळ
मग जिज्ञासेचां डोळां : देखासि माझें स्वरूप ५३०

१ श. °दडवीं. २ श. * ३ गश. °हसैं. ४ गद. °ःकरणीं.
५ दश. मग°. ६ दश. * ७ ग. भ्रांतीचें.

ठीकवणी[1] पाराखि न सीके[2] : तरि रत्नाचे खुतले रंग केवि देखे ?
भ्रमेरु[3] परिमळातें नोळखे[4] : तरि मालती केवि भोगी ? ५३१

करण-चातुर्य न पढे सुंदरी : तरि चक्रवर्तितें केवि आवरी ?
सराउं न किजे राजकुमरीं : तरि तयां जैतें[5] कैंचें ? ५३२

तैसें जिज्ञासा[6]—यंत्रें वीण : ब्रह्मविद्येची दृति काढी कवण ?
म्हणौनि करांवें श्रवण : भक्तराया ! पैं " ५३३

## ६३

उद्धवदेवीं भणितलें " जी ! तूं कर्मीक शास्त्रश्रवणें नेणीजेसीं "

तवं उद्धवदेवों[7] म्हणे : " जि ! तुं जाणिजासि[8] शास्त्रश्रवणें
हें देवाचें बोलणें . मज प्रत्या नें[9] ये ५३४

तुं नित्य स्वयंप्रकाश : तुंतें बोलावेया देवां कैचा पैसु ?
तुझिये मायाशक्तिचा डोळेलांसु : लागला ब्रह्मादिकां ५३५

प्रमाणांचा[10][11] बंबाळ दिवा : न देखे वेदांचा मांदिमेळावा
आगमा नाहीं रीगात्रां : तुझां स्वरूपीं ५३६

तुझा करावेया प्रकाशु : योगशास्त्रां नाहीं सौरसु
सांख्यां[12] लागे मोहपाशु[13] : तुंतें निरूपितां ५३७

१ ग. °णीयां. श. ठीकणियां. २ द. सीखे ३ दश. भवरु.
४ श. न देखे. ५ ग. जीवींत. ६ द. जिज्ञास°. ७ गद. तुआं°.
८ द. देउ°. ९ ग. जाणी°. द. °नेसी. १० ग. नैए. श. नैय.
११ श. तुझेया°. १२ ग. सांक्षा. १३ श. मोहो°.

तुझेया ज्ञानाची घर-डौंहाळि[1] : सकळ शास्त्रातें घेतली
पैरि[2] सृष्टिचिये पोकळी : नातुडेचि तें ५३८
म्हणौनि साधन नाहीं ऐसें : जेणें तुझें ज्ञानरत्न दीसें
तुं जाणवीसि कृपावशें : तैचि[3] जाणिजे " ५३९
यावरि नागार्जुनाचा गोसांवीं : ज्ञानाची बंबाळ दीवी
कैसी[4] उजळीलें[5] ते निहाळावी : वित्तरागीं[6][7] ५४०

## ६४

श्रीकृष्ण चक्रवर्ती भणितलें " ज्ञानाचें कार्यें, अज्ञान
अन्यथाज्ञान नीवर्तौनियां ईश्वरीं बुद्धि "

मग म्हणे श्रीचक्रपाणि : " आइकैं भक्तशिरोमणी !
ज्ञानतरूची पहीली चणि : ऐसीचि[8] होए ५४१
तुटे अज्ञानाचा पाशा : निवर्त्ते[9] अन्यधर्माची अवदशा[10]
नवल उदैजे दशा : ब्रह्मसुखाची ५४२
पैरमेश्वर[11]—ज्ञानाचां डोळां : वाळुनि देवताचक्राचा मोळा
घेईजे टांकु तुका[12] आगळा : परब्रह्माचा " ५४३

१ ग. डोळी. दश. डहुळी. २ श. पुणु. ३ ग. तारिचि.
४ श. कैसेणि. ५ श. उजळिली. ६ दश वीत°, ७ गश. °आतां.
८ गदश ते ऐसी. ९ गदश. फिटे. १० गदश °दसा.
११ गदश. इश्वर. १२ श. तागळा.

## ६५

उध्दवदेवीं भणितलें " बहुतां प्रकारीं ईश्वरा समान असतां .देवता कां वाळिलिया ? तियाही कां ईश्वर नव्हति ? "

तवं उध्दवदेवो[1] म्हणे : " जी ! कवणें[2] कारणें
देवता-चक्राचें नाणें : वाळलें त्यें[3] ५४४
तें ही नित्य शाश्वत : भववीनाश रहित
आनंदे सदोदित · शक्तिचक्र तें ५४५
त्यें[4] आपुलेनि ईच्छाबळें : करी सृष्टि—संहाराचीं ढालें[5]
शक्ति[6]चक्राचि कवणें बोलें : न[7]व्हे परब्रह्म तें ? " ५४६

## ६६

सर्वज्ञें भणितलें " देवता मोचक नव्हति भणौनि देवता व्यावृत्ति "

तवं म्हणे वन्नमाळी[8] : " ब्रह्मविधेचां वोरकलीं
देवता स्वरूपें कसिलीं : पुणु जालीं दळाचीं तीयें ५४७
तया शक्तिचक्राचां तगटीं[9] : धांवंडिजे[10] क्षुद्रानंदाची पीठी
म्हणौनि भक्तजगजेठी ! : मज सारिखें दिसें ५४८

१ शा. देओ. द. दे‌ऊ. २ द. कवणा. ३ गद्‌शा. तें. ४ द. °लेन.
५ द. ढाळे. ६ द्‌शा. चक्र. ७ द. न्हवे. ८ गद्‌शा. वन°.
९ द्‌शा. तकटी. १० ग धांव°. द. धाव°.

जैसे सगात्र सघन : होति पर्वतिचे पाषाणे[1]
परि लोहाचें कनक होए ते खुण : परीसींचि आति[2] ५४९

नां तरि कर्णिकराचा झेला : पांतां वानु होय सोनेसळा
परि परिमळाचा उमाळा : तो चांपौळांचि आति[3] ५५०

तैसिया ऐश्वर्यादि[4] गुणी थोरा : देवता असति अपारा
पुणु[5] षडगुणाचिया[6] भांडारा : गोसावीं मीचि ऐकु[7] ५५१

अवीद्येचेनि काजळें : माझें स्वरूप न मैळे
देवताचक्र कवळे : अज्ञानांजनें तेणें ५५२

६७

" जीवहि मोचक नव्हति भणौनि जीव व्यावृत्ति "

जिवाचियां[8] आक्षौणी[9] : पडिली अवीद्येची गवसणी
म्हणौनि प्रबोध रंगी रीगवणो : नव्हे तैयास्तत्र[10] ५५३

आंधळेयाचां[11] नगरीं : कवण कवणांतें पडिखरी ?
बहीरीयांचां[11] घरीं : कवण कवणां आळोंचु सांघे ? ५५४

मुंकेनि[12] मुंका : केवि कीजे बोलिका ?
निंदसुरे[13] एकमेकां : चेववींति कैसे ? ५५५

१ ग. पाखाण. २ ग. आथि. द. आथी. ३ द. °सिचि आथी. ग. आथि. ४ गश. इश्व°. ५ श. परि. ६ गश. खड्°. ७ द. * ८ दश. जीवा°. ९ ग. आक्षोणि द अक्षोणि. १० गदश. तेया°. ११ द. यांचा १२ श. मुकीएण. द. मुकेण. १३ गश. नीदसुरेयां.

तैसी अवींद्येची उकळी : जेया जिवजातांतें बुडळी
ते केवि तारीति भवजळीं : एकमेकांतें ? ५५६

म्हणौनि उध्दवदेवा ! आणिक : जिवासी कंव्हणी नंव्हे मोचक
माझें ब्रह्मस्वरूप एक : वांचौनियां " ५५७

६८

उध्दवदेवीं भाणितलें " जीवब्रह्मां भेद नाहीं भणौनि
' खाल्विदं ब्रह्म ' बोलों आदरीलें "

तवं उध्दवदेवो म्हणे : " पांतां जिवब्रह्माचीं लक्षणें
भेदाचें नाणें : कांहिं देखिजे ना ५५८

ब्रह्मचि अवींद्यावशें : जिवरूपें पढियासे
जेवि अनेकधा आकाश दीसे : घटादिभेदें ५५९

नां तरि दर्पणी जैसा : उमटे मुखाचा ठसा
प्रतिबींबु जिवु दिसे तैसा : अवींद्येचां ठाई ५६०

म्हणौनि कैवल्यनाथा ! : पांतां जीवब्रह्माची वेवेस्था
भेदु तो सर्वथा : देखिजे ना ५६१

अवधारीं सर्वज्ञ-राजा ! : तुं वांचौनि[११] दुजा
कव्हणी हा भ्रमु माझा : फेडिता नाहीं " ५६२

१ द.जेयां. २ दश.तारी. ३ द.कवण्ही. ४ दश.न्हवे. ५ द.वांचु ६ गश. काहीं. ७ गदश. बींबरूपु. ८ गदश. जीउ तैसा. ९ गदश. दिसें. १० द. व्यवस्ता. ११ द. वांचुनि.

## ६९

### बंधमुक्तांचीं वेगळीं लक्षणें

( १ )

तवं सर्वज्ञ-राओ म्हणे : " आईक सावधें अंतष्करणें
बंधमुक्तांचीं[1] वेगळीं[2] लक्षणें : सांघैन तुज ५६३

एकाचि नित्यमुक्त नित्यबध : हें बोलणेंचि असंबध्दं[3]
वरि ब्रह्म तें शुंध्दबुध्द[4] : तरि बंधु कवणासि ? ५६४

जिवब्रह्मीं अभेदु बोलतां : यूक्ती वीशेषुं[5] नाहीं सर्वथा
म्हणौनि न करीं वादकथों[6] : उध्दवदेवा ! तुं ५६५

( २ )

भेदाची सासनें तीन

सांघैं भेदुं[7] काइ एकत्त्व म्हणतं[8] ? : किं भिन्नासि ऐक्यता ?
किंवा भेदाची आभावरूपता : तो अभेदु बोलिजे ? ५६६

( ३ )

' अभेद एकत्व ' या सासनाचें व्याख्यान.

पहिलां पांक्षि[9] आंइक[10] दुषण : जें दुजेयाचेयां[11] आपेक्षां[12] एकवचन
म्हणौनि भेदाचें समर्थन : [13]आंपैसेंचि जालें ५६७

१ ग. बध्द°. द. द्वंद. २ द. वेगळालि. ३ श. °बध.
४ दश. सुधबुध. ५ गद. विशेषु. ६ द. हे° ७ द. अभेदु.
८ श. म्हणतां. ९ शग. पक्षीं १० द. आईक ११ द. दुजयाच्या.
१२ गद. अपेक्षा १३ गश ° सेयाचि.

एकवचन बहुवचन मानिसी[1] : आणीक भेदु[2] न मनीसि
ऐसी वीरूधोक्ति[3] देशी : तुजाचि साजे ५६८

जरि भिन्नासि ऐक्यता : तरि तें काई विनाशु नव्हैतां[4]
किं नाशाची उत्तरावस्था[5] : ते ऐक्य बोलिजे ? ५६९

विनाशु नव्हैतां[4] ऐक्य : तरि तें बोलतां अशक्य
स्वस्वरूपें वर्त्तमान काचोमाणिक्यां[6] : ऐक्य[7] कैसें ? ५७०

ना नाशुपूर्वक ऐक्यता : तरि तै बोलों नये सर्वथा
सांधैं धर्मियेंचि नाहीं तेथ : ऐक्य कवणांसीं ? ५७१

म्हणौनि भिन्नैक्य अभेदु : हा दुजा पक्षु मंदु
तीसरा भेदाभाओ अभेदु : तो पक्षुचि न्हे ५७२

## (४)

### सामान्य वाक्य दूषण

जरि भेदु नाहिं सीध्दु : तरि तयाचा कैसा निरोध्दु[8]
करुनि अभेदु : समर्थिसि तुं ६७३

जैसें ज्ञानाभावो अज्ञान : बोलतां वेगळें नव्हे[9] ज्ञान
तरि परम व्यावृत्ति अज्ञान : निरूपुं[10] नये ५७४

१ श. मनिसि २ गश. भेदु तरी. ३ द. विरु ४ द. न्हवतां.
५ श. वस्था. ६ दश. काच॰. ग. काचु॰. ७ ग. ऐक्यत्व.
८ द. निक्षेदु. श. णीषेदु. ९ दश. न्हवे. १० गश. नीरोपुं

तैसें भेदांगिकारें विण : करूं नेंये[1] अभेद लक्षण
म्हणौनि भेदाभाओ अभेदु [2]हे न म्हण : मंत्रिपती ! तुं ५७५
न मनितां भेदाचें दळवाडें : कव्हणी वेव्हारु[3] न घडे
म्हणौनि अभेदमत्तें[4] सांकडें : समर्थितां " ५७६

## ७१

तवं उध्दवदेवीं भणितलें " अविद्यावशें ब्रह्म परिणमलें "

तवं म्हणे भक्त–नरेश्वरू : " जि ! घडावेया व्येवहारु
भेदाचा अंगिकारु : मियां [x]हिं[5] कीजे ५७७
पुर्णे[6] तें अविद्यावशें : ब्रह्मचि नाना रूपें[7] पढियासे
म्हणौनि अद्वैत आपैसें : सिध्द होये " ५७८

## ७२

सर्वज्ञें भणितलें " जीव ब्रह्मयासी अवीद्या
अवच्छेदक भणौनि दूषण बोलिलें "

तवं–सर्वज्ञ राओ म्हणे "आईक : काई ब्रह्मासि अवीद्या अवच्छेदक ?
किंवा प्रतिबिंबक : दर्पणाचिया परी ? ५७९

१ द. नेय. २ श. * ३ द. व्याव : श. व्यवहारु. ४ श. मत.
५ ग. हीं. ६ गदश. पुणु. ७ दश. * ८ गद. अवि॑.

## प्र० ९.

**२५.** सौंदर्याच्या बाबतींत ती रतीच्या भ्रूलतेवर चढाई करते, अर्थात् रतीच्या भ्रूलतासौंदर्यापेक्षां कवितेचें सौंदर्य अधिक आहे. **चातुर्य**–सौंदर्य. **अंगरागाचें पडप**–आपल्या अंगांतील (अंतःकरणांतील) शृंगारादि रस-रंगांनीं रंगवलेलें भूषावस्त्र. (कवितेनें संध्येला दिलेलें आहे.) सायंकाळीं संध्यादेवी धारण करीत असलेलें आरक्त वर्णांकित वस्त्र तिचें स्वतःचें नसून तें तिला कवीच्या कवितारमणीनें अर्पण केलें आहे असा अभिप्राय.

**२६. स्यामा**: शीते सुखोष्णसर्वांगी ग्रीष्मे या सुखशीतला ।
तप्तकांचनवर्णाभा सा स्त्री श्यामेति कथ्यते. ॥

**३१. ब्रह्मविद्या**–परमेश्वराविषयींचें ज्ञान; अध्यात्मविद्या. महानुभाव महंत आपल्या शास्त्राला ' ब्रह्मविद्याशास्त्र ' असें संबोधतात.

**३२. कां न लवावि**– अंगाला कां लावूं नये ?

**३४.** अध्यात्मशास्त्राच्या तत्त्वांची शृंगाराला जर फोडणी दिली तर–; केवळ रूक्ष नव्हे तर शृंगारादि साहित्यानें युक्त असलेलें तत्त्वज्ञान कोणाला आवडणार नाहीं ? **दीसे** = दीजे.

**३५. राहाण**– ज्याच्या अंगांत देवतादि गणांचा संचार होतो असा भगत. **अवतरण**–देवता वगैरे अंगांत येणें, वारें. साहित्यरूपी भगताच्या अंगांत शांतिरसाचें वारें संचरविणारी कवीची वाणी कोण ऐकणार नाहीं ? म्हणजेच परमेश्वरज्ञानाच्या सिद्धांतांनीं उचंबळून आलेलें रसालंकारयुक्त वाङ्मय सर्वांना प्रिय होईल. हेंच रूपक भास्करानें शिशुपालवधांतही वापरलेलें आहे. पहा–' परिमळाचां राहाणीं : अनंगा अवतरौनि आणी' (८१३)

## प्र० १०.

**३९.** अध्यात्मज्ञानाची गोडी–आवड तर मला नाहींच, उलट अज्ञानाचें दृष्टिबंधन माझ्यावर पडलेलें आहे; अज्ञानानें आपला पगडा माझ्यावर बसवलेला आहे.

**४०.** श्रीकृष्णोद्धवसंवादांतील एका अक्षरानेंही हा संसार पाश चुकवितां येणें (जन्म मरणाच्या फेऱ्यांतून मुक्त होणें) शक्य आहे म्हणून–,

## प्र० ११.

**४२. अष्टभोगः** सुगंधवनितावस्त्रं गीतताम्बूलभोजनं ।
शय्या च भुवनं चैव अष्टभोगाः प्रकीर्तिताः ॥

**४६. उपनिषद्**—वेदांच्या ब्राह्मण ग्रंथांना जोडून असणारा वेदांतपर भाग. ईश, केन, कठ, प्रश्न, मुंड, मांडुक्य, तित्तिर, ऐतरेय, छांदोग्य व बृहदारण्यक हीं दहा प्रमुख उपनिषदें होत.

**४७. विज्ञानः** 'तैसी जाणीव जेथ न रिघे। विचार मागुता पाउलीं निघे। तर्कु आयणी नेघे। आंगीं जयाच्या ॥ अर्जुना तेया नांव **ज्ञान**। येर प्रपंचु हें **विज्ञान**' (ज्ञाने अ. ७।५–६). **योगः** पातंजळ योगाचा अनुयायी, योगी.

## प्र० १३

५३. यदुवंशरूपी वेळूचीं वनें (अर्जुन) जाळावयाचीं होतीं.

**५५. धारसा**—एकदा मनुष्य नदीच्या धारेंत (प्रवाहांत) सांपडला म्हणजे त्याला ती धार चुकवितां येत नाहीं त्याप्रमाणें ब्राह्मणाचा शापही चुकवितां येत नाहीं. **ब्राह्मणाचा शापः** नारद विश्वामित्रादि ऋषी व सर्व यादव पिंडारक क्षेत्रास गेले असतांना तेथें ऋषींची थट्टा करण्याच्या उद्देशानें यादवांनीं सांबाला स्त्रीवेष देऊन ऋषींच्या समोर नेलें. व विचारलें कीं —'हे गर्भवती। पुत्रकाम असे वांछिती। काय निश्चितीं प्रसवेल ?' कपट जाणोनियां साचार। थोर कोपले ऋषीश्वर। मग तिहीं काय वाग्वज्र। अति अनिवार सोडिलें ॥ ' अरे हे प्रसवेल जें बाळ। तें होईल सकळ कुळा काळ। निखळ लोहाचें मुसळ। देखाल सकळ मंदभाग्यें' ॥ (ए. भा. १–३५८,६७,६८).

## प्र० १४

या प्रकरणाला आधार भागवत. अ. ६ श्लोक ४२.

६१. पहा–'अन्तःकालें यदुकुलस्य विधाय वेणुस्तम्बस्य वह्निमिव शान्तमुपैमि धाम' भाग. १।४. यदुवंशवंशजाळी। वाढली श्रीकृष्णकृपाजळीं। तेथें अवकृपेची इंगळी। ऋषिशापमेळीं कपटें पडिली ॥ (ए. भा, १–२३२)

६२. पुढें ६६ ओवी पहा.

६३. जेथें प्रत्यक्ष काळाला उभारवस्त्यापर्यंत देखील येऊं दिलें जात नाहीं.

## प्र० १५

भागवत. अ. ७ मधील पहिल्या ३ श्लोकांवरील ही टीका होय.

६७. **पुढ** ऐवजी **फुग** प्रतींतील **फुडें**(स्फुटम्)हाच पाठ योग्य दिसतो.

६९. मी गेल्यानंतर या पृथ्वीवर किती एक गोष्टी होतील != अनेक उलथापालथी होतील.

## प्र० १६

७१. उद्धव जरी अत्यंत विवेकी पुरुष होता तरी कृष्णविरहाच्या कल्पनेनें मात्र तो तात्काळ मूर्च्छित झाला. विरहकल्पनेला विवेकाचें बंधन घालूं शकला नाहीं.

## प्र० १७

या प्रकरणाला भागवत ६ व्या अध्यायांतील ४३ ते ५० या सहाच श्लोकांचा आधार आहे. भास्करानें उद्धवदेवाचा शोक थोडा अतिशयोक्तीनें वर्णन केला आहे हें खरें, पण त्यावरून त्याच्या स्वतंत्र काव्यशक्तीची चांगली जाणीव होते.

७८. सेवेप्रीत्यर्थ मला पुढें पाठवावें.

७९. **देवक**=देवासंबंधीचें, **देवक्रिया**–देवाच्या; **आपुलेपन**= आपुलकी, आप्तपणा.

८२. भाक्तिरुपी वाज (तडा गेलेलें काशाचें भांडें). माझ्या भाक्तिरुपी भांड्याला अगोदरच तडा गेलेला आहे. तशांत माझा आत्माच असलेला जो तूं त्या तुझ्या विरहाग्नीची अकाल–वीज जर त्या भांड्यावर पडली तर ती मी कशी सहन करूं शकेन ?

८३. या जगांत मला केवळ तूंच एक आवडता असल्यामुळें तुझ्या विरहाच्या कल्पनेनेंही माझा हा असा शेवट ( मृत्यु ) होऊं पाहत आहे. पण परमेश्वरा ! तुझ्या विरहानें कुणाच्या हृदयाच्या ठिकऱ्या उडणार नाहींत ? ( माझेंच काय पण सर्वांचींच हृदयें फुटून जातील ! )

९९. शृंगार रसांतील खरा रस नाहींसा ( निर्यास ) झाला.

**१०१. सनकः** ब्रह्मदेवाच्या चार मानसपुत्रांपैकीं एक.

**१०३.** जीवांच्या व्यापाराचें; सामान्य जीवाप्रमाणें आचरण करणें सोडून जे मुक्तितीर्थांची यात्रा करतील त्यांचें रक्षण कोण करील ?

**१०७,** जंबुद्वीपाच्या सीमाप्रांतांत येऊन अधर्म ( जंबुद्वीपाला ) वेढा घालील, जंबुद्वीपांतील कर्मभूमि अधर्माच्या पाशांत गोंवली जाईल. तेव्हां धर्मरक्षणाची जबाबदारी आपल्या शिरावर घेऊन ( धर्माची कड घेऊन ) अधर्मरुपी शत्रूशीं, श्रीकृष्णा ! तूं गेल्यावर कोण भांडणार ?

**१०९.** कलियुग हींच एक, तीन रस्ते जेथून फुटतात अथवा जेथें मिळतात अशी जागा. वध्य व्यक्तीला अशा ठिकाणीं बसविण्याची प्रथा पूर्वी असावी. कलियुगरूपी तिवटण्यावर केविलवाण्या धर्माला कां बरें बसविलें? एखाद्या वध्य व्यक्तीप्रमाणें कलियुगांत धर्माची स्थिति होईल हा भाव. उत्तरार्ध. **उगाणा**–हिशेब करून एखाद्याचा नीट निकाल लावणें. आचारांचा हिशेब वगैरे करून ते तुम्हीं कुणाच्या स्वाधीन केले ? कलियुगांत आचारांवर बरीच धाड येणार असल्यामुळें तुम्हीं प्रयाण करण्यापूर्वीच त्यांची योग्यरीतीनें मोजदाद करून संरक्षणासाठीं त्यांना कुणाच्या तरी हवालीं करा असा उद्धवाचा भावार्थ.

**१११ केळि**–(१) केळीचें झाड (२) क्रीडा. करुणारूपि केळीला (कदलीला) तुम्ही कां हाणलें ? करुणारुपी केळीच्या झाडावर घाव कां मारले ? अथवा, करुणा–क्रीडेला कां मारलें ? श्रीकृष्ण निजधामाला गेल्यानंतर त्याच्या कारुण्याच्या लीला पुन्हा होणार नाहींत. कारुण्य–लीला मरून पडतील हा भाव. **हालि**=हाणलेंत

**११२** ब्रह्मशाप हेंच स्मशान, त्यांत यदुवंशरूपी वेली जाळली जाणार.

**११४** पहाः—कंटकटा घातया । कैसें जाइलें अनुग्रहा यया. ( ज्ञाने. १२–४०० )

**देवकिया**–देवकीनें. तिच्या कुशींत तरवार भोसकून तिच्या जवळचें

कैवल्यरत्न अशा रीतीनें ( काळाला ) कां हिरावून न्यावयाला सांगितलेस ?

११६. त्यांनीं कुंतीच्या पोटीं जन्म घेतलेला असला तरी ते सर्वस्वीं तुझ्याच मांडीवर घातले गेलेले आहेत–ते तुझेच पुत्र आहेत; त्यांच्या संरक्षणाची-जबाबदारी तुझ्यावर आहे.

११७. धर्माला संकट पडलें म्हणजे त्यानें तुझें स्मरण करतांच तूं याच्या संरक्षणार्थ मोठ्या अभिमानानें धांवून जातोस. **सळा**–अभिमानी.

**११८. पैजा मांडोनि:**' न धरीं शस्त्र करीं मी गोष्टी सांगेन युक्तिच्या चार ' अशी श्रीकृष्णाची प्रतिज्ञा होती. पण ' कृष्णाला हातांत शस्त्र धरावयास लावीनच ' अशी प्रतिज्ञा केलेल्या भीष्मानें अर्जुनाला मृतप्राय करून टाकलें असतां त्याच्या संरक्षणासाठीं श्रीकृष्णानें आपली प्रतिज्ञा मोडून हातांत सुदर्शनचक्र धारण केलें; हा प्रसंग येथें लक्ष्य आहे. **हावसिलें** ऐवजीं **हातवसीलें** ( **कग.** प्रती)हाच मूळ पाठ असावा.ओव्या २४० व४४५पहा.

**११९. नाट जाणें** अथवा **येणें**–to omit to render the service or aid promised or expected (मोल्सवर्थ) यावरून **नाटि**=संरक्षणाचें अंगीकृत कार्य, असा अर्थ करावयास हरकत दिसत नाहीं.

**१२०.** तिचा जिवंत राहण्याचा मार्गच तुम्ही नाहींसा करीत आहां!

१२१ लोभाला अपर (पलीकडचा)=लोभशून्य. **विरहाग्नीचे०** =विरहाग्नि हेंच एक पांच रंगाचें वस्त्र. अग्नि हा पांच वर्णांचा आहे असें मानतात. म्हणूनच त्यास 'चित्रभानु' असें एक नांव आहे.

१ २. **पाटेंफुटें**–पाटें (सं, पट्ट)=उंची वस्त्र–शेला; फुटा=फेटा, पागोटें (पहा मू० प्र० १९४७) पाटेंफुटें=शेलापागोटें. जीवांचा उद्धार करण्याचें शेलापागोटें कुणाला दिलें? हा मान कुणाला दिला? यापुढें जीवोद्धरणाचें काम कुणावर सोंपविलें ?

१ ५. **'सेश**–अभिशेष प्रतिष्ठेचा एवं मानाचा' चौक कवणा भरीला? (मुक्तिसाम्राज्यावर कुणाला अधिष्ठित केलें ? ) असा अर्थ टीपकार देतो. पण सेश=अभिषेक–प्रतिष्ठा असा अर्थ घ्यावयास आधार सांपडत नाहीं. यापेक्षां

**सेश=मळवट** अर्थ घेणें प्रशस्त वाटतें, 'सम्राट्पदाचा मळवट कुणाला लावला व सम्राट्पदाची रत्नमाला कुणाला अर्पण केली ?'

**१२४** विज्ञाना (चौदा विद्यादि शास्त्रा–) पासून उत्पन्न होणाऱ्या निबिड आनंदाचा स्वामी–नायक कुणाला केलें ?

**१२५ षड्गुण**: 'समः सर्व स्वतंत्रस्य निरापेक्षस्य निर्गुणः। सर्वज्ञः तृप्तिकामस्य षडैते गुण ईश्वरः' असा, व्याकरणदृष्ट्या फार अशुद्ध श्लोक टीपकार देतो. त्यावरून ईश्वराच षड्गुण लक्षांत येतीलच. एकनाथांनीं भागवतांत 'यश, श्री, वैराग्य, ज्ञान। एश्वर्य, औदार्य, हे षड्गुण। नित्य वसती परिपूर्ण। तो मी नारायण भगवंत' असा षड्गुणांचा निर्देश केला आहे.

**१२६** पुढें २८६ ओवीवरील टीपा पहा. 'विज्ञानासाठीं कोणतें नशीब राखून ठेवलें आहे!' अथवा विज्ञानाला कोणता प्रकार केला; त्यासाठीं कोणती योजना करून ठेवली ?

**१२९ मोडिलें** हाच पाठ प्रशस्त दिसतो.

**१३० अरळ** शब्दाचा कोमल असाच अर्थ बहुतेक कोशकारांनीं दिलेला आहे. या शब्दाचा केवळ विशेषणाप्रमाणेंच उपयोग होतो असें त्यांचें मत दिसतें. पण या ओवींत त्याचा नामाप्रमाणें उपयोग केलेला आहे. मुक्ते. सभा. अ. १५–१६८ यांतही त्याचा नामाप्रमाणेंच उपयोग आलेला आहे. त्या सर्वांवरून 'आच्छादन, पुष्पशय्या'–हाच त्याचा अर्थ करणें इष्ट वाटतें

**१३० रवणा** (रमण्यांत, क्रीडागृहांत) सारीपाटाचा खेळ चालू असतांना आनंद (आनंद उत्पन्न करणारे फासे) कवण सारील! (फासे कोण टाकील?) परमेश्वरा! तू गेल्यावर सागस्या कुणाशीं खेळावयाच्या ? हा भावार्थ; **जिणा**–जिंकलेल द्रव्य,

**१३२** आतांपर्यंत ब्रह्मादि देवतांना दूर ढकलून मी तुझीच सेवा करीत होतों. पण तूं गेल्यावर मी कोणाची सेवा करूं? **ताट काढणें**=उच्छिष्ट सावडणें, सेवा करणें.

**१३३.** पहा: 'ऐसें वाउनी भयाचें भोज। एथ काय निपजवूं पाह-

तासि काज' (ज्ञा. ११–३६५)

१३४. **साचासु**: दोन्ही टीपग्रंथांत **सावासु** असाच हा शब्द असल्यामुळें **ग** प्रतींतील पाठ घेणें इष्ट आहे.

१३८. मी फांका करून दिल्याशिवाय आपण लिंबूही खात नव्हतां !

१४३. तुझा विरह झाला म्हणजे मी प्राणाची बोळवण करावी—प्राणत्याग करावा.

१४४. जीविताची (जिवंत राहिल्याची) कुटी (खोटेपण—दूषण) आपणेया नाणावी (आपल्यावर येऊं देऊं नये).

१४५. पुढें केव्हां तरी तुला संनिधान देऊं अशी उधार गोष्ट सांगू नये; संनिधानाच्या उधार देण्यापेक्षां आतांच तुझा वियोग होऊं देऊं नकोस.

१४८. **षट्चक्र**: योगशास्त्रानुसार मनुष्याच्या पिंडांत ( भ्रूमध्याच्या खालच्या भागांत) एकावर एक (उत्तरडी) अशीं सहा चक्रें मानिलीं आहत. तीं येण प्रमाणें, (१) गदस्थानीं मूलाधारचक्र (२) लिंगस्थानीं स्वाधिष्ठानचक्र (३) नाभिस्थानीं मणिपुरचक्र (४)हृदयस्थानीं अनाहतचक्र (५) कंठस्थानीं विशुद्धचक्र (६) भ्रूमध्यस्थानीं अग्नि (अथवा आज्ञा) चक्र. **मेरुशिखर**—वर वर्णन केलेल्या षट्चक्राच्याही वर मेंदूच्या वरती अधर असें 'सहस्रदळकमळ' नांवाचें सातवें चक्र आहे. त्यासच मेरू (अथवा त्रिकुट) शिखर म्हणतात. **इडा**—नाभिचक्रांतून निघून उजव्या नाकपुडींतून वाहणारी एक नाडी. **पिंगळा**—इडे प्रमाणेंच पण शरीराच्या डाव्या भागांतून वाहणारी नाडी.

१४९ **ब्रह्मरंध्र**: मस्तकाचें छिद्र जेथें पाठीच्या कण्याच्या वरच्या अंगास टेंकल्यासारखें होतें तें ब्रह्मरंध्र.

१५२. मी स्वतःला (आपणपें) डोळानें मिरवीन—मी जिवंत राहीन, हीच अश्लाघ्यता .

## प्र० १८

१५४. **प्रवृत्ति विशेषु**—आचार विशेष, मी उपदेशिलेल्या विशिष्ट

आचार—नियमांची तूं सेवा कर, माझ्यामागें त्याप्रमाणें आपली वागणूक ठेव.

१५५. **मासीं**—माझ्याशीं

## प्र० १९

१५७. तुझ्या मुगुटावरील निर्माल्यमाला जर मला मिळाल्या तर; तुझा प्रसाद मिळाला तर;

१५८. महामोहाला दाव्यानें बांधतों; अथवा, त्याला गाठोड्यांत बांधतों (त्याची गठडी वळतों).

१५९. तुझ्यासाठीं उटणें तयार करीत असतांना, सहाणेवर चंदनाबरोबर अहंकारालाही मी घोळतों. **भुअरी**—भोंवरी, वर्तुलाकार गति, त्यावरून भुअरी=वर्तुलाकार गतीनें उगाळण्याची क्रिया.

१६५. **टाकुनिः** 'टाकणें'चें प्रथम पुरुषी अनेकवचनी क्रियापद प्रेमाच्या शस्त्रानें (अथवा प्रेमाचा वेढा घालून) आम्ही प्राप्त करूं.

१६७. मी मायाशक्तीला नांगवें (न+आंगवें)—प्राप्त होत नाहीं, तिला मी आटोपत नाहीं, तिच्या बंधनांत मी सांपडत नाहीं; तिच्याशीं झुंज घ्यावयला मी समर्थ आहे पण तुझी विरहव्यथा मात्र माझ्याकडून सहन होणें शक्य नाहीं.

## प्र० २०

१७१. शरीररूपी फुटकें भांडें देऊन त्याच्या बदला कैवल्यरूपी सोनेवाटी मिळत असली तर, विरहव्यथारूपी बाजारांत ही अदलाबदल अवश्य करून घ्यावी.

१७२. **अवस्थेचेनि कडलेखें**: कडलेख=लगतचा प्रांत. अवस्थेच्या (परमेश्वराशीं तदाकारवृत्ति, तन्मयता; तिच्या) जवळपास नेहमीं राहून उरलेले दिवस घालीव.

१७५. विषयसुख त्याला तिडका उठवितात, स्वर्गसुखें चडफडावयास लावतात.

१७६. **शांभव वेधः** ब्रह्मानंद. आत्यंतिक आनंद; पुण्य फळांचें पीक देखील डोक्यांत बसतें (कंटाळा आणतें).

१७८. **सैया पाळितां**: "कोणी एक शय्यापालना नाम ब्राह्मणी पतिव्रता असे: ती शास्त्रद्वारां आपुलिया पतीच्या धर्मी वर्ते: आपुलिया पतीचिया सेजे आणिकीसी रिगो नेदी: आपण कवणाची वास न पाहे: तियेचिया देखोदेखीं तियेतें पुसपुसो सेजा शुद्री असे तीही तैसीच वर्ते : तरि जे गति तियेसी होय तेच गती तियेसी होय" (दृष्टांत प्रमेय. असन्निधान धर्म. १) या शय्यापालने प्रमाणेंच भक्तानें परमेश्वराशीं अनन्य भावानें वर्तावें.

१७९. पद्य: न वस्तव्यं त्वयैवेह मया त्यक्ते महीतले। जनोऽधर्मरुचिर्भद्र भविष्यति कलौयुगे(भाग.७-५)सर्व जग अधर्माच्या पाशांत कवळलें जाईल.

१८०. विषयांची चाहुल लागल्याबरोबर जेथें शृंगाररूपी भूताचा अंगांत संचार होतो.

१८१. "तीर्थ, क्षेत्र, व्रत, दान यें चारी असति : तया गांवातें **पुर** ऐसें म्हणिजे : क्षेत्र नाहीं आन एरें तीन्हीं असति : तया गांवातें **पाटण** ऐसें म्हणिजे : तीर्थ आहे आन एरें तीन्हीं नाहींति : तया गांवातें **नगर** ऐसें बोलीजे.

१८२. **उपभोग**-विषय हीच चोरवस्ती. **भोगभुवन** पाठ अधिक प्रशस्त. टीपग्रंथांत तोच पाठ आहे. = क्रीडागृह.

१८५. **गवांदि**: 'तीळ ओव्या हुरडा एकत्र करीत : भावें सरकत: ' (टीप.) तीळ हुरड्याप्रमाणें निंदा स्तुतींचें मिश्रण होय. अथवा, गवांदि—अन्नसत्र, अनेक मुनि एक ठिकाणीं जमले म्हणजे तेथें निंदास्तुतींचें जणुं कांहीं अन्नसत्रच उघडते.

१९०. ज्ञान दुर्गांवरील हुडा (बुरूज) जो टाकी (प्राप्त करून घेतो, जिंकतो) तोही.

१९५. 'चोरवाट जैसी थोडीचि : परी आवघड असे : तैसें दोन बोटें गोड वाटे : एवं दोनिचि बोटें रसना अधीष्ठान : तल्लक्षणें चोरवाट : तेथ चोर उभे राहाति : तल्लक्षण पदार्थ परत्वें गोडी तेचि दांगटे= कोळी, चोरटे आझोडिति" दोनच बोटें रुंद परंतु जिंकावयास अत्यंत कठिण

अशी जिव्हा हीच चोरवाट. तेथें माधुर्यरूपी चोर उभे राहतात व ते धैर्याला बडवितात. जिव्हेच्या माधुर्यलोलुपतपुढें, तिला जिंकण्यासाठीं अंगीं आणलेलें धैर्य तेव्हांच गडबडते, हा भाव.

१९७. वाजौठी: आवाज करणारी काठी अथवा भाला. रात्रीं प्रवास करतांना जीवजिवाणूंना पळवून लावण्यासाठीं घुंगरें लावलेल्या काठ्यांचा अजूनही उपयोग करतात. निराहारता हीच वाजौठी, तिनें रसनेंद्रियाला जितकें दडपण्याचे यत्न करावे;—

१९९. संयमाच्या बेडींत गुंतवून रसनेला जर बंदिखान्यांत घातलें तर,—

२००. संन्याश्यानें विचाररूपी कड्यावर (पर्वतावर) वैराग्यरूपी उडी घालावी. विरक्त होऊन विवेकाचा आश्रय करावा व नंतर उपोषणादिकांनीं शरीराची कोरडी करावी—शरीर वाळवावें.

२०१. योगी कसा प्रेताप्रमाणें दिसावयाला लागतो तें तुला सांगतो.

२०५. दोन्ही बाहू काढले जातात, निखळून काढल्यासारखे ढिले होतात.

२०९. झणें भवासि—भ्रमण करूं नकोस.

२११. आत्मा हाच लोहदर्पण, त्यावर ईश्वर ध्यानरूपी राख ठवून तो स्वच्छ उटावा म्हणजे मग शेवटीं—ध्यान संपल्यानंतर, हृदयांत ईश्वर-मूर्तीचें प्रतिबिंब स्पष्ट उमटेल.ब्रह्म रसें(कृपापूर्वक)बघेल, पुढें ओवी २४५ पहा.

२१४. आचाराच्या या दुर्गम किल्यावर माझ्याकडून राहवलें जाणें अशक्य आहे.

२२८. पहा: त्यागोऽयं दुष्करो भूमन् कामानां विषयात्मभि: ।
सुतरां त्वयिसर्वात्मिन्नभक्तैरिति मे मतिः ॥ भाग ७-१५

२२९. त्याग आचरावयाचा चांगला मार्ग (साजिरी धरोपरी) घरांतच (गृहस्थाश्रमांत राहूनच सहजसाध्य) असतां या संसारांत (जगांत) कदन्न हीच विवसी—जखीण, तिच्या ताब्यांत जावयाचें कोणी कबूल करणार नाहीं (उपाशी राहून किंवा कदन्न खाऊन संन्यासाश्रमाचें आचरण करावयाला कोणीच तयार होणार नाहीं.)

**२३०.** सोहांशी देखील एकदम गांठ घेतां येईल, त्याचाही तात्काळ नाश करतां येईल.

**२३१. कुलाचल:** महेंद्रो मलयः सह्यः शुक्तिमान् ऋक्षपर्वतः । विंध्यश्च पारियात्रश्च सप्तैते कुलपर्वताः ॥ कुलपर्वताचे कडे (घाटे) मुष्टींनीं (करपुटें)चूर्ण करता येतील पण,विषयवज्र ज्याला तुटे(जो तोडी)असा कोणीच पाहिला नाहीं.

**२३२. प्राणापान:** शरीरांतील दोन प्रकारचे वायु. 'हृदि प्राणो गुदेऽपानः'

**२३४. मी आळिलां**=आवळला गेलों;ममतेच्या विळख्यानें गा.डला गेलो

**२३७.** 'निरुपण तेंचि रंगः तथा अंगणः अचळ=काष्ट रोविती तें त्याग लक्षणें आढाळ वेळुवाचेः तथा गाळ चाळिती हातावरः तथा गाडेयाचें वगाड' (टीप) डोंबाऱ्याच्या खेळांत कमरेला खोवलेल्या वेळूवर अथवा गाडीवरील खांबावर डोंबारी चढून तथें तोल सांभाळण्यासाठीं हातांत वेळू घेऊन निरनिराळे खेळ खेळतात त्याचें या ठिकाणीं रुपक केलें आहे.

## प्र० २४

**२४०.** विजय मिळविण्याची इच्छा असली तर मुहूर्त सांगणाऱ्या ज्योतिष्यावर तरवार चालवूं नये. **सरवदा**—डाकुलता, ब्राह्मण बाप व गवळीण आई यांपासून जन्मलेला. या वर्गाचें काम भविष्य सांगण्याचें असतें म्हणून सरवदा = भविष्यवादी; ज्योतिषी.

**२४२. नाचों** ( नाचवितां ) **नय** ( नए ). संन्यासलक्षण त्याग हेंच राज्य, तुझ्या ऐवजीं मला नाचवितां येत नाहीं; मी त्याचें आचरण करून उपयोग नाहीं. मोक्षार्थी तूं असल्यामुळें, संन्यासही तूंच केला पाहिजे.

**२४३.** महामोह हा ब्रह्मविद्येचा पाठलाग करीत आहे. या मोहाचा मार्ग शोधून काढून त्याला ब्रह्मविद्येचा पाठलाग करणें सोडून द्यावयाला लावणारा त्याग; अथवा, मोहरूपी तस्कराचा माग काढून, त्याजवळ असलेला ब्रह्मविद्येचा लाग ( लाभ, पळविलेलें धन ) त्याला सांडावयास ( टाकून द्यावयास ) लावणारा त्याग.

२४५. तत्त्वाचे पारखी ( परीक्षक ) लोक; तत्त्व ओळखणारे लोक; अथवा,लोक-तत्त्व (जगत्तत्व, जग काय आहे, वगैरे ) पारखणारे. ( मुनि )

२४७. सृष्टी हीच एक टांकसाळ. तेथें देहरूपी अनेक नाणीं पाडलीं जातात. पण नरदेहाशिवाय इतर कोणतींच नाणीं ( मोक्षाच्या बाजारांत ) चालत नाहींत. चोरमोळा—पुसटलेला; जास्त हाताळले गेल्यामुळें चोपडें झालेलें नाणें बाजारांत चालत नाहीं हें प्रसिद्धच आहे.

२४८. मनुष्यदेह प्राप्त झालेल्या ज्ञात्या पुरुषांनीं ज्ञानाच्या साह्यानें संसाराचा अस्त केला—संसारबंधन तोडलें.

## प्र० २६–३१

२५२. **ज्ञानाचा निडारु**—ज्ञानानें निडारलेला,परिपक्वदशेस आलेला.

२५८. संसाररूपी दाटवृक्षांचीं वनें ज्यानें एकदम जाळिलीं असा.

२६०. तूं आंगवणा ( पराक्रमानें) पुरता ( पूर्ण, बलाढ्य ) आहेस

२६२. जनेषु दह्यमानेषु कामलोभदवाग्निना ।

न तप्यतेऽग्निना मुक्तो गंगाम्भस्थ इव द्विपः ॥ भाग ७–२९

२६६. यापुढील यदुअवधूत संवादाचीं प्रकरणें ( चोवीस गुरूंचें वर्णन ) भागवत अ. ७, ८ व ९ च्या साह्यानें लिहिलेलीं आहेत. तीं अभ्यासूंनीं पहावीं.

२७०. एकेकापासून एकेक गुण मी घेतला असल्यामुळेंच हे माझे गुरु म्हणून संबोधिले जातात. एरव्हीं ज्ञानमार्गावरील खरा गुरु ईश्वरच आहे.

## प्र० ३२

२७६. **रस**ः कटु, आम्ल, मधुर, लवण, तिक्त आणि कषाय हे षड्रस.

२७७. **प्राणु**—प्राणवायु. हाच वायु शरीर—स्थितीला कारण असतो.

२७८. जर आहार घेतला नाहीं तर तें देहनाशाला कारण होईल (पण ईश्वरस्मरणासाठीं देह तर जातां कामा नये) आणि अधिक आहार घेतला तर धर्माच्या ठिकाणीं निर्बलत्व प्राप्त होतें ( धर्मकार्याकडे लक्ष राहत नाहीं) म्हणून योग्यानें 'ज्ञानधारणा न ढळे । इंद्रियें नव्हतीं विकळें । तैसा आहार युक्तिबळें । सेविजे निजधैर्यें॥ ' (ए. भा. ७–४१३)

## प्र० ३३

२८०. पहा—तेजोऽवन्नमयैर्भावैर्मेघाद्यैर्वायुनेरितैः ।

न स्पृश्यते नभस्तद्वत्कालसृष्टैर्गुणैः पुमान् ॥ भा. ७-४३

मेघांच्या आश्रयानें आकाश झांकोळलें जात नाहीं अथवा मेघाच्या वृष्टीनें तें ओलें होत नाहीं.

## प्र० ३४

२८२. आपल्या सात्त्विक आचरणानें योग्याला पावित्र्य प्राप्त झालेलें असल्यामुळें त्याला (उदकाप्रमाणें) तीर्थत्व सहजच येतें. प्रमेय ( अध्यात्म-ज्ञानाचे सिद्धांत) बोलौनि (सांगितल्यामुळें) तो अमृता धरु (आधार) जाला. पाणी जसें अमृताप्रमाणें गोड असतें तसें योग्याचें प्रमेय-प्रवचन मधुर असल्याकारणानें तोही अमृताचा आधार (अमृताश्रय) मानिला आहे.

## प्र० ३५

२८९. तापसपणें, (अंगांतील प्रखर तेजामुळें पहाः 'तेजस्वी तपसा दीप्तो दुर्धर्षः' भाग ७–४ ) निलाग (संबंध ठेवतां न येण्यासारखा, हातांत न धरला जाणारा) अग्नि हा असळगु (सुगम—धरायला सोपा)नाहीं; तर तो दुर्धर्ष होय, म्हणून त्याच्याकडे कोणी जात नाहीं.

२९०. भजनें (यज्ञयागादिकांनीं आदृष्ट (स्वर्गमोक्षादि फळें कालांतरानें प्राप्त होतात म्हणून तीं अदृष्ट) जोडे; प्रगट झालेल्या अग्नीवर पाक-निष्पत्ति होणें हें दृष्ट—तात्कालिक फळ होय.

२९३. महानुभावांच्या मतें जीव नित्य आहे. पहा 'नित्यवर्गी जीवः देवताः परमेश्वरः उरेति' ( ऑसिसू.-संहार. १० ) तसेंच 'नित्यः केवळः अनादि अविद्यायुक्त वस्तु एकु आति ते जीव शब्दें बोलिजे' (महावाक्य २)

२९४. शरीराची चंद्रकलांशीं व जीवाची चंद्राशीं तुलना केलेली आहे.त्या कलांप्रमाणें जन्म, स्थिति, वृद्धि, विपरिणमन, क्षय व मृत्यु हे षड्विकार देहालाच लागूं आहेत, जीवाला नाहींत.पहा-जन्मनाशादि षड्विकार। हे देहासी व साचार आत्मा अविनाशी निर्विकार। अनंत अपार स्वरूपत्वें ॥ (ए. भा. ७-५१३)

२९७. घरोघरीं कोट्यवधि दिवे जळत असले तरी सर्व मनुष्यांना (अथवा, त्या सर्व दिव्यांच्या साह्यानें देखील) अंधःकारांत आपले व्यवहार चालवितां येत नाहींत.

२९८. अंतर (अंतःकरणपूर्वक) भजन व बाह्य (टाळ मृदंगादि बाह्य देखाव्यानें युक्त) भजन. केवळ भक्तीनें नव्हे तर ज्ञानपूर्व भक्तीनेंच मोक्ष मिळूं शकतो हा महानुभावांचा सिद्धांत या ठिकाणीं लक्षांत घेतला पाहिजे.

३००. आपल्या नेत्रांच्या ठिकाणीं सूर्य-देवतेचें अधिष्ठान असतें. अशी कल्पना आहे. जगांतील यच्चयावत प्राणीमात्राच्या नेत्रांत अंशरूपानें सूर्य–देवतेचें अधिष्ठान असलें तरी तीं संपूर्ण रूपानें मात्र स्वतःच्याच ठिकाणीं असतें.

३०२. या ओवीचा वाच्यार्थ स्पष्टच आहे. टीपकाराचा निराळा अर्थ काढण्याचा प्रयत्न योग्य वाटत नाहीं ती टीप अशी 'आत्मा=संलग्न: कां इंद्रिया मनातें चेष्टवीता आत्मा : जैसे कां जविन=वांचणें : सुर्येकरीं=सुर्ये रस्मीकरूनि सकळ वनस्पत्या वाढति : दुसरें : जीवन=उदक : तें वनस्पत्याचा मुळीं पावे: सुर्येकरी=सुर्याची रस्मी तपे: तेणें : तैसें ईश्वरीं सकळ ज्ञानें जाणावीं : कां ब्रह्मविद्या सकळांही विद्या अनुषंगीका म्हणितलें म्हणौनि : '

## प्र० ३८

या प्रकरणाला आधार भागवत अ. ७ श्लोक ५२ ते ७४.

३०७. **'अविद्येची**–जैसी अविद्या आन जीव तैसी तीये ' (टीप)

३०८. त्या दोघांचें परस्परावरील प्रेम म्हणजे अहंकाराचें मूर्तिमंत दास्यच; किंवा, ममतेचें मूर्तिमंत जोडरेंच; किंवा, अभिलाषाचा मूर्तिमंत बहरच.

३१०. हावभाव विलासस्थिति । येरयेरांकडे पाहती(ए.भा ७-५५५)

३११. **चा०ल** ऐवजीं **पाउल** हा पाठ मूळ असावा मागाहून पहावयास मिळालेल्या प्रतींत ' पाउल ' हाच पाठ आढळतो. पहा : 'स्त्रियेसी सांडूनि दूरी । पाऊल न घाली बाहेरी '(ए.भा. ७–५५८)

३२०. अर्थाच्या दृष्टीनें **वजतां** हा **गश** प्रतींतील पाठ चांगला आहे.

३२२. **जिवनकळा उसासिली :** जीवज्योति बाहेर टाकली गेली–मोठी झाली. ( दुःखाचा उमाळा बाहेर पडला ) अथवा, आईची

दृष्टिभेट झाल्याबरोबर त्यांचे प्राण खोंचले गेले, हृदयांत भाला टोंचल्या-प्रमाणें त्यांना फार दुःख झालें.

३२९. बंधी असें असावेंसें वाटतें. मोहाचा पाश कोणाला बांधीत नाहीं ? अथवा, कोणाला बाधत नाहीं—पीडा देत नाहीं ?

३३१. असक्तां : आसक्त.

## प्र० ३९

३३५. सयमु—संयमी, योगी; देही सत्वक्षेमुः शरीराच्या ठिकाणीं सत्वसंपन्नता-पराक्रम असतो. सर्पाप्रमाणेंच योगीही शरीरबलसंपन्न असतो. हें शरीर—बलच धर्मानुष्ठानास उपयोगी पडतें. पहाः 'ओजःसहोबलयुतं' भाग. ८—४ तसेंच 'शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्' कुमार. ५-३३

## प्र० ४०

३३८. पहा : समृद्धकामो हीनो वा नारायणपरो मुनिः । नोत्सर्पेत न शुष्येत सरिद्भिरिव सागरः ॥ ( भाग ८।६ ) 'नारायण—शेषशय्या : तयाचेनि योगें : क्षीरसिंधुसि आगाधत्व आलें : अगाध=अंत न कळे : तथा गहनता : ऐसें वैभव आलें : तैसा स्मरणें करूनि ईश्वर हृदइं साठवीला म्हणौनि ब्रह्मवीदासि आगाधत्व आलें' ( टीप ).

## प्र० ४१

३४१. पंखांनीं ज्वाला—ज्योत ( जाळु ) आलिंगतो.

३४९. 'भुरें—भुलि : जैसी ब्रह्मप्रकाशिका ( ? ) : यथा कानफटे स्त्रीयवरि रक्षा टाकीति आन भुले' ( टीप ).

३५३. अंधःकाराप्रमाणें असणारे ( दृष्टीला अंध करणारे ) विषय (कामोपभोगादि), त्यांची धूळ अंगावर उडाली असतां कांहींच सुचत नाहीं, विवेक राहत नाहीं. हस्तस्पर्शाला, हा मनुष्य आपला, हा दुसऱ्याचा, हें ओळखतां येत नाहीं. विषयांध मनुष्य, आपली परावी याचा विचार न करतां कोणत्याही स्त्रीला स्पर्श करतो.

३५५. सत्त्वाला निद्रा-समय होतो—झोप लागते. सत्त्व गुण लोपतो.

## प्र० ४२

३४८. एकाच घरीं नेहमीं भिक्षा मागितल्यानें विरक्तीचा नाश होतो, आसक्ति उत्पन्न होते.

३५०-५३. पहा—भ्रमरु रिघोनि पुष्पामधीं। फूल तरी कुचंबों नेदी। आपुली करी अर्थसिद्धी। चोखट बुद्धि भ्रमराची॥ तैसीच योगियांची परी। ग्रासमात्र घरोघरीं। भिक्षा करुनि उदर भरी। पीडा न करी गृहस्थां॥ ए. भा. ८-९२, ९३.)

३५४. भ्रमर ज्या प्रमाणें निरनिराळ्या फुलांतून मध गोळा करतो त्या-प्रमाणें ब्रह्मविद पुरुष वेदविद्यादिकांचें मंथन करून तेथील सिद्धांत ग्रहण करतो.

## प्र० ४३

३५८. **शौर्य** शब्द शूर पुरुष या अर्थानें वापरलेला आहे. **बळ**—बलवान् पुरुष. 'शूर पुरुषासमोर तटाप्रमाणें ताठ उभा राहणारा व बलवानापुढें न हटणारा'. अथवा शौर्य, बल यांचे वाच्यार्थ घेतले तर 'शौर्याच्या योगानें ताठून उभा राहणारा व बल नें कधींही न हटणारा.'

३५९. तो जुझारां (वीर योद्धयांशीं) गडे (युद्ध करण्यांत तल्लीन-धुंद होतो), पायांत मोठमोठ्या शृंखला घालण्याचा यत्न केला तर त्या काढतो (तोडतो) अथवा मोठ्या शृंखला नुसत्या पायानीं ओढीत नेतो. एवढा बल-वान् पण तो जर करिणीच्या ताब्यांत सांपडला (स्त्रीसंग करीत असला) तर धाओ न धरी (धरावयास आलेल्यांचा हल्ला त्याला थांबवतां येत नाहीं. अथवा विषयाचा हल्ला—मदनवेग आवरतां न आल्यामुळें तो बंधनांत सांपडतो.)

३६०. 'प्रमदा लक्षणें भडखंबा=भडखंळीमध्यें (रणभूमींत अथवा देवळीजवळ) सेंदूर लाउनि पुतळी आकारुनि अंधारीं मनुष्य देखुनि दचके: भावें भडखंबा=अंधारीं चीरा (पाषाण) उभा देखिजे: तथा सुळ!'(टीप) **भडखंबा:** विजयस्तंभ, यावर स्त्रियांचीं वगैरे चित्रें काढलेलीं असतात. विजयस्तंभ या अर्थानें हा शब्द अजून प्रचलित आहे.

३६३. अपस्मार–फेंपरें आलें असतां माणसाच्या तोंडांतून फेस गळून खुर्र खुर्र असा आवाज होतो.

३६४. ब्रह्मविद्येचा फोळ (गहाण पडलेला माल ) आडाये (अड-वून ठेवते.) ऋणकोला कर्ज फेडतां आलें नाहीं म्हणजे धनको त्याचा माल अडवून ठेवतो–जप्त करतो. स्त्री जणु कांहीं विरक्त पुरुषाला अंगसंग देऊन त्या कर्जाची फेड त्याच्याकडून न झाल्यामुळें त्याची ब्रह्मविद्या जप्त करते, तात्पर्य मनुष्य स्त्रीच्या पाशांत सांपडला म्हणजे त्याचें अध्यात्मज्ञान, विचार वगैरे सर्व नाहींसें होतें.

## प्र० ४४

३६९. मन स्मरणीं दक्ष. नव्हे; संग्रहींचि लक्ष. ओवी २७५ पहा.

## प्र० ४५

३७०. मागल्या बाजूनें अंगावर अकस्मात् बंधन पडतें.

३७१. पडितां हा पाठ घेणें चांगलें. एखादें पान, किंवा खडा पडला तरी वाफडे (दचकतो). भीतीनें (भिणारे) त्याच्या सारखें दुसरें सावजच नाहीं.

## प्र० ४७

३७६. **सामान्य रमणी** : वेश्या. Public woman.

३८४. ‘ जाइली–लोंवाळ : आन पांढरी तथा बंदरी स्वान ’ (टीप) अंधारांत एखादें केसाळ कुत्रें जरी दिसलें तरी कुण्यातरी विलासी पुरुषाचा सेवक आपल्याकडे आला आहे असा तिला भास होई. **जाइली**-जाउळ=केस.

३८८. पहा : अहो मे मोहवितर्ति पश्यताविजितात्मन : ।
या कान्तादसतः कामं कामये येन बालिशा ।। भाग ८--२९.

३९३. वरील टीप पहा. ‘ ज्याच्या अंगाच्या उष्णतेनें ( घामानें ) कामी स्त्रियांचा शृंगार विटतो असा गंवार( गबाळ्या ) पति. ’

३९४. पहा : यदस्थिभिर्निर्मितवंशवश्यस्थूणं त्वचारोमनखै : पिनद्धम् ।
क्षरन्नवद्वारमगारमेतद्विण्मूत्रपूर्णं मदुपैति काऽन्या ।। भा. ८-३२

३९५ ज्या हातापायांच्या ( हाडांच्या ) मोळीचा संबंध अमेध्याशीं (रक्त मांस मज्जादिकांशीं)पडलेला–झालेला आहे त्यालाच मनुष्य म्हणतात.

३९६. खांद्यावर पखाल वाहून नेत असतां ती जशी गळते तसा शरीरांतून घाम गळतो. शरीर ह्मणजे श्लेष्मादिकांचा चिखल वाहून नेणारें गटार होय; अपान–वायु बाहेर टाकणारा हा एक चामड्याचा भाता आहे.

३९८. हें मळमूत्राचें भांडें असल्यामुळें खरोखर याच्या जवळही जाऊं नये. पण असें असूनही आतां पर्यंत मी याला कवटाळीत होतें; या सारखें ( दुसऱ्याचा घाणेरडा देह कवटाळण्या सारखें ) दुसरें पापच नाहीं. ( घाणेरडें कृत्यच नाहीं )

३९९. आपली दृष्टी ( निहारू ) याचा ( शरीराचा ) अंतर्भाग पाहणें सहन करूं शकत नाहीं, इतका तो घाणेरडा आहे. **निहारु**–न्याहाळून पाहण्याची क्रिया.

४०४. **कवडे** : कवड्या प्रमाणें क्षुद्र पैसा. **मोल**–पैसा, द्रव्य.

४०६. ‘ **सींगवटी**–सीळें मांस असे: तें विकावेया पशु मारुनि सीर तेथ ठेविति : तेणें तें वीके : तैसें शृंगार तलक्षेण सींगवटी करुनि जीयें ’ ( टीप ). मांस शिळें असलें तरी तें ताजेंच आहे असें भासविण्या-साठीं एखाद्या नुकत्याच मारलेल्या पशूचें शिंग शिळ्या मांसाजवळ ठेवतात त्या प्रमाणें वयातीत असली तरी मी तरुण आहे असें भासविण्यासाठीं वेश्येनें केलेली शृंगाररचना म्हणजेच सींगवटी; पोळयाच्या वेळीं बैलांच्या शिंगांना केलेल्या शृंगाराला देखील सींगवटी म्हणतात. ( रंग रंगोटी शिंग शिंगोटी ) यावरून सामान्य अर्थ–शृंगाररचना.

४०७. ‘कडेचे लेख ते कडलेख’ मुख्य द्रव्य गेलें मग शेष उरलें तें’ टीप.

४०८. पैज लावून (मुद्दाम) विषयांच्या मार्गें धांवाधाव करण्यांत.

४१०. **याचिया अवस्था** : याच कारणासाठीं; परमेश्वरप्राप्तीसाठीं

४११. **चर्या** ऐवजीं **परीया** हा **द** प्रतींतील पाठ मूळ असावा. सकळ लिपींत **प** चा संकेत **च** व **च** चा संकेत **पं** आहे. त्यामुळें असा घोटाळा झाला असावा. **परीया** = परीनें, मार्गानें, रीतीनें.

४१२. पहा: ग्रस्तं कालाहिनाऽऽत्मानं कोऽन्यस्त्रातुमधीश्वरः। भाग ८-४०

**४१३.** ' विषय रम्यता = विषयाचा ठाइं रमण–रूपता होती : ते विचारीली = तयाची वीवंचना केली ' विषय खरोखर रम्य आहेत काय या संबंधीं विचार केला. **कांतासा :** इंद्रियोपभोगासाठीं एखादा विलासी पुरुष आपल्याकडे यावा अशी तिच्या मनांतील इच्छा.

**४१४. निराश्रया** ऐवजीं **नैराश्य** हाच पाठ प्रशस्त आहे. पहा : आशा हि परमं दुःखं नैराश्यं परमं सुखम् । यथा संछिद्य कान्ताशां सुखं सुष्वाप पिंगला ॥ भाग. ८-४३.

**प्र० ४८**

या प्रकरणांतील ऋष्यशृंगाची कथा भागवतांत एकाच श्लोकांत (अ. ८-१८) असून, गायन ऐकल्यानें प्राणी कसा न कळत बांधला जातो हें दाखवणाऱ्या 'कृष्णसार' गुरूच्या प्रकरणांत ती आलेली आहे; व त्याच ठिकाणीं ती शोभून दिसते. भास्करानें ती कथा तेथून काढून येथें कां घातली, कांहीं कळत नाहीं. ऋष्यशृंगाला, चोवीस गुरूंपैकीं एखाद्याचें स्वतंत्र स्थान नाहीं हें लक्षांत ठेवावें. ही कथा येथें सविस्तर वार्णिलेली असल्यामुळें ती वरून भास्कराचें स्वतंत्र प्रतिभाशालित्व मात्र चांगलें नजरेस येतें.

**४१५. ऋर्षीशृंग :** ऋष्यशृंग; कश्यपवंशीय विभांडक ऋषीचा पुत्र. विभांडकाचें रेत एका हरिणीनें भक्षिल्यामुळें तिला हा पुत्र झाला. याच्या डोक्यावर एक हरिणाचें शिंग होतें म्हणून त्याला ऋष्यशृंग हें नांव पडलें. याच्या वडिलांनीं बरेच दिवस याला स्त्रीचें दर्शन सुद्धा होऊं दिलें नाहीं. रामविजय. अध्याय ३ रा पहा.

**४२०.** ऋष्यशृंगाला बोलावण्यासाठीं वधुजनातें पाठविलें.

**४२१. पात्रकळिका** हें त्या नायिकेचें नांव. मदनबाण मारण्यांत ती श्रेष्ठ (गोसाविणि) होती. अथवा, मदनाच्या अनेक शस्त्रां (मार्गांका) मध्यें, पात्रकळिका ही श्रेष्ठ (गोसा०) होती पात्रकळिका म्हणजे मदनाचें अमोघ शस्त्रच.

**४२२.** चंद्रकिरणांतील संगीता (मधुरता–गानमाधुर्य) पात्र कळिकेच्या रूपानेंच जणुं मूर्त झाली. अथवा, स्वच्छ चांदणें पडलें आहे, त्यांत कुणा

तर्शी गीतनृत्यवादन (संगीत) करीत आहे. चंद्राकिरणाच्या वृष्टीमुळें ज्यांना विशेष मनोहारित्व प्राप्त झालें अशा त्या तिन्ही कला (अथवा संगीत ) त्या नायिकेच्या रूपानें जणुं मूर्तिमंत झाल्या, असा भाव.

४२४. शृंगार हेंच एक देवालय, तेथील माहाकाळी (अधिष्ठात्री देवता).

४२५. गणांचें (अनुयायांचें, सैन्याचें) चक्र (समूह); घन=दाट, चक्र=समूह ' टीप.

४२६. मलयानिल या वाटाड्यानें आम्रवृक्षांची राई (जेथें ऋष्यशृंग होता ती) दाखविल्यानंतर (मदनानें) ऋतुराज वसंताला तेथें पुढें पाठविलें.

४२७. प्रथम त्यानें ( वसंतानें ) स्वत:साठीं तेथें केतकीचा एक सुंदर मंडप केला. केवड्याच्या पानांना परिमलाची पुटें देऊन त्यांची छपरावरील गवताच्या ठिकाणीं योजना केली. त्या छपराला केतकीच्या बुंध्याचे टेके देऊन तो केतकी- मंडप वसंतानें शृंगारला. (सेइलें—शाकारलें भावें शृंगारलें )

४२८. ' नंतर, चंद्र हाच ज्योतिषी त्यानें सांगितलेल्या बळानें (मुहूर्तावर) वसंतानें त्या तपोवनावर चाल केली ( वाइलें ). वसंत त्या वनांत आला त्यावेळेस त्याला चंद्रबलही अनुकूल होतें, चंद्र आकाशांत पूर्ण कलांनीं विहार करीत होता. चंद्रप्रकाश कामोत्तेजक असतो हें येथें लक्षांत घ्यावें. ऋतुराज आल्याबरोबर त्या तपोवनांत (सर्वांनीं) हातांनीं कालवाकालव केली; ' वसंत आला, वसंत आला ' असें आनंदानें हात उचलून जो तो म्हणूं लागला, त्यामुळें जिकडे तिकडे गोड गजबजाट झाला.

४३०. ' मदनाचे पांच बाण ते कवण : जारण १ : मारण २ : उच्चाटण ३ : मोहन ४ : स्तंभन ५ : जारण हृदइं : मारण स्तनद्वइं : उचारण नेत्रीं : मोहन मुखीं : स्तंभन वैश्यकरण तें मुख्य इंद्रियें (स्मरमंदिर) टीप. कुसुमाकर—वसंत, त्याच्या तारुण्यानें (तो यौवनांत असतां) कोण ठाकणार (त्याला वश) होणार नाहीं !

४३२. कमळवनाच्या घाटाकडे जेव्हां मदनाच्या सैन्याचा हल्ला झाला तेव्हां तीं कमळें इतकीं डोलूं लागलीं कीं तीं पाहून, हीं कमळें नसून कामिनी—कबंधें आहेत व तीं ऋषींच्या मागें लागलीं आहेत असें वाटलें.

**४३३. भुररें** : पुष्परागरूपी वशीकरणाची रक्षा; वरे:=निवारू शके.

**४३४.** कोकिळांची घाडी ( टोळी ) हीच वसंताची नाइकवडी (आघाडीचें सैन्य); त्या खांचिती (हल्ला चढवितात ). **खांविती** हाच पाठ प्रशस्त आहे. खांचणें=डांसणें; अथवा, वसंताच्या सेनेचे जे नायक होते त्यांनीं प्रथम कोकिळांच्या टोळीवा हल्ला चढविला.

**४३६.** वसंतानें मारलेल्या मकरंदाच्या पिवकाच्या संयमातें नागवीति.

**४३७.** या पुष्पावरून त्या पुष्पावर धुमाळीनें उडणाऱ्या भुंग्यांच्या योगानें पुष्पपरागाची जी धूळ उडाली तिनें विचारावर हल्ला चढवतांच (आझोडितां) त्याला (विचाराला) आघोलि जाली, झोके (आंदोल) मिळाले. विचार झोके खाऊं लागला–दोलायमान झाला; गडबडला. **आघोलि** हाच पाठ चांगला आहे. ' आघोडि ' घेतल्यास ' ल ' 'ड' मध्यें अभेद मानावा.

**४३८.** मग कामिनी जन, मृगीसुताचे जुझार (ऋष्यशृंगाकडील योद्धयावर–तपस्व्यावर) वाति (चालून गेले.) पहा: तेणें रीतु–रायें **वाइलें** ४२८.

**४३९. हीरवा** : त्याच्या ब्रम्हचर्याचा भंग न करतां ( टीप).

**४४०. यक्षकर्दम** : कुंकुमागुरुकस्तूरी कर्पूरं चंदनं तथा ।
महासुगंधमित्युक्तं नामतो यक्षकर्दमः ॥

**४४१.** चुचुक हेच चरु ( लहान वाटोळीं भांडीं ) त्यांच्या ठिकाणीं (चर्या); गुढीपाडव्याच्या दिवशीं एका लांब दांड्यावर खण व त्यावर उपडा चरु ठेवून त्याला माळा घालतात; बकुलांच्या माला ह्याच गुढ्या; पालिवाचिया (चोळीच्या पदरांच्या) पालवसातिया (पताका) झळंबति (फडफडतात).

**४४२. झाडुनि** : ' सरिसे करुनि : ' ' तासुनि ' ( टीप ); पहा: ' काढुनि प्रलयविजूचीं जुंबाडें । मग पानासिले गगनाचे हुडे ' ( ज्ञाने ११–३५८ ) ' मेखलेचे मणी ह्याच भैरव (भयंकर) टेंकुळिया ( टेंकुळिया–युद्धाचीं भांडीं, टीप ); मावे. ' कित्येक प्रतींत ढेंकुळिया ऐवजीं टेंकुळिया असा पाठ आढळतो. टीप ग्रंथांत तोच पाठ आहे. टेंकुळिया=तोफा डागण्या-साठीं उभारलेले मोर्चे; पर्यायानें तोफा वगैरे. संदर्भानें, ' रणवाद्यें ' हा अर्थ योग्य वाटतो.

४४३. केसांत खोंचलेलीं केवड्याचीं पानें ' तयाचे बांधारे–आडवे मोर्चे बांधले : वरि–मस्तकीं शीसफुल, चंद्ररेघ तथा ताइतादिक अलंकार : तल्लक्षेण शस्त्रास्त्रें '

४४४. धैर्य-धडकु–मूर्तिमंत धैर्याला देखील धडक (भीति) लावणारा.

४४५. तिनें मदनाचें शस्त्र परजल्यावर, तिच्याशीं युद्ध करण्याची कोण्या विरक्ताची ( विषयाचा वीर; विषय जिंकणारा ) छाती होती ? आणि एकदम, सरिसी (श्रेष्ठत्व) पाडी–जिंकी, ऐसा कवणु असे ?

४४७. आपल्या शरीररूपी बाणांनीं त्याचें अंतःकरण भेदल्यावर.

४५१ पुष्पांजुळि–उजवा हात सर्पशीर्ष करून त्याच्या तळहातावर डाव्या हाताचीं बोटें विकटमूत ठेवलीं म्हणजे त्या हातास पुष्पपुट (पुष्पांजलि) म्हणतात; ( भा. ना. पृ. ६१ ) असा पुष्पांजुळि हस्त मनगटाच्या ठिकाणीं खेंवंग करीत–वरखालीं वांकवीत वांकवीत, पात्रकळिका नृत्य करूं लागली.

४५२. तेरा अंगतुकाचिया-नृत्यांत,कमरेपासून कंठापर्यंत हलणाऱ्या अंगाचे १३ प्रकार आहेत. त्यांचीं नांवें अशीं– (१) क्षाम (२) खल्ल (३) पूर्ण (४) नत (५) उन्नत (६) प्रसारित (७) विवर्तित (८) अपसृत (९) सम (१०) निर्भुग्न (११) आभुग्न (१२) प्रकम्पित व (१३) उद्वाहित पैकीं पहिल्या तीन अवस्था उदराच्या असून, त्या पुढील पांच, उदराच्या-वरील भागाच्या व शेवटच्या पांच, वक्षस्थळाच्या आहेत. यांचीं सविस्तर वर्णनें भारतीय नाट्यशास्त्रांत पहावीं. ( भा. ना. पृ. ५२-५३ )

४५३. 'आभिन्नावि जाणवीः भावें सन्मुख होउन प्रकट करी' टीप. सत्तीसदृष्टी–दृष्टीचे छत्तीस प्रकार भरतमुनीनें सांगितले आहेत. त्यांत ८ रस, ८ स्थायी व २० संचारिणी दृष्टींचा समावेश होतो. त्यांचीं नांवें–रस-दृष्टी–कांता, भयानका, हास्या, करुणा, अद्‌भुता, वीरा, बीभत्सा, व शांता. स्थायीदृष्टीः स्निग्धा, हृष्टा, दीना, क्रुद्धा, दीप्ता, भयान्विता, जुगुप्सिता व विस्मिता. संचारिणी दृष्टीः शून्या,लज्जिता, म्लाना, विषण्णा, शंकिता, मुकुला, कुंचिता, जिह्मा, अभितप्ता, ललिता, वितर्किता, अर्धमुकुला, विभ्रांता, विप्लुता, आकेकरा, विकसिता, मध्यममदा, अधममदा त्रस्ता व (?) भा.ना.पृ.१८९-

टीपकारानें निराळ्याच ३६ दृष्टी दिल्या आहेत.त्या देऊन जागा अडविण्यांत अर्थ नाहीं. 'आटी–हातापायांत नीगोनि: शरीराची घडी करी.भावें आटी= तापसांचीं सर्वांगें आटोनि पीळा करी: तथा आटी=मूर्छित करी'( टीप).

.४५४. **हस्तकांचा विवरू**–हाताचे प्रकार एकूण २४ आहेत. ४५५ ते ४५७ पर्यंतच्या ओव्यांत आलेले प्रकार नृत्यांतील हस्तक्रियेचेच आहेत. त्यांचीं लक्षणें पुढें येतीलच.

४५५. **पताका**–हाताचीं सर्व बोटें सरळ पसरून आंगठा किंचित् आखडणें (भा.ना.५६ ) **त्रिपताका**–पताक हात वर करून त्यांतील अनामिका (करंगळी जवळचें बोट) वांकवली म्हणजे त्रिपताका हात होतो. (भा. ना. पृ. ५६ )

४५६. **खटूकामुखु** हा **गदश** प्रतींतील पाठच योग्य आहे. मूळ संस्कृत नांव हेंच आहे. पांच बोटांपैकीं फक्त मध्यमा तळहातापर्यंत वाकवून, करंगळी व अनामिका किंचित् वक्र करून, उभ्या आंगठ्या भोंवतीं तर्जनी विळखा घालून ठेवली म्हणजे 'खट्कामुख' होतो. **सूचिमुख**: खट्कामुखांतील तर्जनी आंगठ्या भोंवतीं न फिरवतां समोर करून ठेवावी म्हणजे ती सुई ( सूचि ) प्रमाणें दिसते.

४५७. **मृगीसुरू** (मगशीर्षक )–हाताचा पसा करून हात उभा ठेवला म्हणजे सर्पशीर्ष हस्त होतो. वरील स्थितींतच आंगठा व करंगळी बाजूस करून सरळ उंच पसरावीत आणि मधलीं तीन बोटें खालीं वाकवावीं म्हणजे अंगठा व करंगळी हरिणाच्या शिंगाप्रमाणें दिसतात. हाच'मृगीसुरु' हात. **आरळु** : ( सं. अराल ) आंगठा आकुंचित करून तर्जनी धनुष्याकाराप्रमाणें मधेंच वांकवून बाकीचीं बोटें सरळ पसरवून ठेवावीं. **मुष्टिकु**-सर्व बोटें मिटून तळहातास चिटकवून त्यांवर आंगठा ठेवावा ( वस्तु लपवायची असली म्हणजे मूठ जशी घट्ट धरून ठेवतात तसा )

४५८. **सयत-हस्तक**–दोन्ही हातांनीं मिळून करावयाच्या क्रियेस संयुतहस्त क्रिया म्हणतात. (वर आतांपर्यंत वर्णिलेल्या क्रिया असंयुत–हस्त–

काच्या, अर्थात एका हातानें करावयाच्या. त्याचे प्रकार २४ ) याचे प्रकार १३. अंजलि, कपोतक, कर्कटक, स्वस्तिक, वर्धमानक, उत्संग, निषध, दोलाहस्त, पुष्पपुट, मकर, गजदन्त, अवहित्थ व वर्धमान (भा. ना.पृ. ६०) पहा. ' संयुत–दोन्ही हाताचें युक्तत्व : दुसरें : पायें नाचणें : मुखें पदें म्हणणें : हातें आर्थ दाखवणें : ' असा दुसरा अर्थ टीपकार देतो. **आठ आंगाचा**–हात, पाय, कटिप्रदेश,वक्षस्थळ,मान,मुख, नेत्र व मस्तक (टीप) **हंसपक्ष** : आंगठ्याशिवाय सर्व बोटें खालीं वांकवून आंगठा वांकडा करून कोणत्याही बोटास न चिकटवितां दूर ठेवावा. **नितंबक**–दोन्ही हात ' पताक ' हस्ता प्रमाणें करून ते स्वतिकाकार करावे. डावा हात उजव्या खांद्यावर व उजवा डाव्यावर ठेवून दोन्ही हातांचीं बोटें खांद्याबाहेर घ्यावीं. अथवा, दोन्ही भुज डोक्यावर ठेवून त्यांचे पंजे व हाताचीं बोटें समोरासमोर येतील असे ठेवावे व मांडया हालवाव्या व पायांचें स्वस्तिक करावें (भा.ना.पृ.९२)

४५९. **छत्रभवरी**–पाय आतिक्रांत ( आकुंचित करून एकदम वर उचलणें व परत उंच करून खालीं टाकणें ) करून भग सम करावा व कमरेखालील भाग वळवून दुसऱ्या पायावर गिरकी घ्यावी. यास भ्रमरी म्हणतात. **अळग भवरी**–अग्रतल पायावर नीट उभे राहून उंच उडी मारून परत उभे राहणें, व अशीच क्रिया वारंवार करणें यास एलकाक्रीडित म्हणतात. वरील दोन्ही नांवें ज्या संस्कृत शद्बापासून अपभ्रष्ट झालेलीं आम्हांस वाटतात त्यांचींच वर लक्षणें दिलेलीं आहेत. 'मोटका (चांगल्या रीतीनें) कळासीत (वाद्ये आन गायन आन नृत्याचा एकवळा : ऐसा एक घोस) करी (दाखवी)' अथवा 'मोटका–नेटका : कळा सीतकरी–मुखें हातें ६४ कळा दाखवी' असे तिसऱ्या चरणाचे दोन अर्थ टीपकार देतो. त्या प्रमाणें या चरणांतील पदच्छेद करून घ्यावा. दोन्हींत अर्थात् 'मोटका' शद्बाचें रूप व्याकरणाच्या दृष्टीनें चुकीचें आहे.

४६०. **रूपक** (धिक् धिक् धाकड धौ-टीप)नांवाच्या चांगल्या तालावर.

४६१. **घन सान म्हणणें** 'थोडेंचि पद म्हणणें : आन : पायें नाचणें तेवींचि भोंवरी माजीं अर्थ सांघणें' **आरबाई देणें** 'उच्च स्वरें आलाप घेणें. उठणें आन बैसणें' ( टीप ) जसजसा आवाज होत होता तसतसे विरक्तांच्या

भोंवतीं जणुं विषयाचे पीळ—वळसे पडत होते. **आरबाईच** पाठ घ्यावा. टीप ग्रंथांत तोच आहे.

**४६१. धर**—श्रुति, स्वरसमूह, त्यांच्या साह्यानें **जती नाचणें**=ललित म्हणत म्हणत नाचणें. **उचितीं**=योग्य अशा. **काळासाचां**=‘गाणें, नाचणें आन वाद्याचां घोष;’ त्यामुळें त्या ठिकाणीं जणुं काय मूर्तिमंत अवतरलेल्या नादब्रह्मानें ऋष्यशृंगाचें दान पात्रकळिकेला' दिलें.

**४६३.** एकतालावर गाइल्या जाणाऱ्या **अभंगावर**—गायनावर ती तन्वंगी राहिली. एकसारखी अभंग नामधेय गायन म्हणत होती. तिनें नाच थांबवला व शेवटीं नुसतें एकतालावरील गीत ती गाऊं लागली.

**४६५.** स्त्रियांच्या गणतींत (लेखा) जो येत नाहीं; त्यांच्या पाशांत जो सांपडत नाहीं असा.

## प्र० ४९ ते ५१

**४६७. कुरुह**—पाण्यांत बुडी देउन मासा घेउन आकाशांत जाणारा.

**४७२. मानापमान** हा पाठ चांगला.पहा—न मे मानावमानौ स्तो न चिंता गेहपुत्रिणाम् । आत्मक्रीड आत्मरतिर्विचरामीह बालवत् ॥ ’भाग९—३.

**४७३. लबधु**—लुब्ध.

**४७६.** घरचे लोक—आईबाप, दारिद्र्याच्या संकटामुळें बाहेर **हिंडा-वयास** (भिक्षान्न मागावयास किंवा उद्योगासाठीं) गेले होते. हिंडी (नाम); **पाटपीढी**—बाजारहाट, शाकभाजी प्रमाणें पाट+पीढी’ हा शब्द. या सामासिक शब्दांतील दोन्ही अवयव एकाच अर्थाचे आहेत.

**४७७. सरूपें** (स्वरूप) **उदंडी**—रूपानें फार चांगली होती.

**४८३.** मोक्षरूपी निक्षेप (सांठवून ठेवलेलें द्रव्य) त्यानें संपन्न होतो. मोक्षाचा ठेवा त्याच्या हातीं येतो.

## प्र० ५२

**४८६.** तयाहि (त्यापेक्षां, यःकश्चित बाणापेक्षां) ईश्वर स्मरण कमी प्रतीचें (निपोटारें) आहे काय ? अर्थात् नाहीं.बाण सरळ करतांना तो(सेलारा)

जितका गढून गेला होता तितका परमेश्वरस्मरण करण्यांत मनुष्य गढून जाईल तर किती बरें होईल !

प्र० ५३

**४८८.** सर्प आपला आहार आणि व्यवहार (आचार) इतरांच्या लक्षांत येऊं देत नाहीं. पहा—'अलक्ष्यमाण आचारैर्मुनिरेकोऽल्पभाषणः' भाग १-१४

**४८९.** लोक कधीं कधीं पाण्यांत पाया घालूनही (अत्यंत कष्ट सहन करून) मंदिरें रचितीं.

**४९२ हींसा आंगविजे**–हिंसेचा स्वीकार करतात. पाया भरतांना कित्येकदां प्राण्यांचा बळी देतात हें प्रसिद्धच आहे.

प्र० ५४

**४९५–४९६.** ऊर्णतंतु कांतिणि ज्याप्रमाणें मायाशक्तिरूपी दोरी करून, ( तंतु काढून ) आपल्या स्वतःसाठीं एक जग निर्माण करते वगैरे. कांतिणीनें कातलेले तंतु हे तंतु नसून मूर्तिमंत मायासूत्रेंच (मायाशक्तीच) असतात अशी कल्पना.कारण ते तंतु तयार करावयास तिला ईश्वरानें दिलेली मायाशक्ति खर्च करावी लागते. त्याचप्रमाणें जीव देखील, तिचा शक्ती ( त्याच, आपल्यामागें लागलेल्या मायाशक्तीच्या साह्यानें ) प्रपंच निर्माण करतो. महानुभावांचा हा एक सिद्धांत आहे. ' मायासृष्टि जीवः जीवसृष्टि प्रपंचु' ॥७॥; 'मग जीवु प्रपंचातें रची ॥१६॥ कां रचीं : जे अधमति : अधगति : अवरति : म्हणौनि रची ॥ १७ ॥' इत्यादि श्रीसिसू. मधील संसरणप्रकरणांतील सूत्रें व त्यावरील टीपा पहा.

**४९७. भस्मा नेलें**–सृष्टी निर्माण करण्याच्या हव्यास पेटून जीव स्वतःची राख ( नाश ) करून घेतो—मातींत मिसळतो—म्हणजेच ' मृत्तिका पर्यंत मैळे; ' महानुभावीय तत्त्वज्ञानांत जीव हा शुद्ध मानलेला आहे. पण केवळ सृष्टीरचनेच्या इच्छेनें परमेश्वरानें जीवाच्या मागें अनेक ' मळ ' लाविले आहेत. जीव जन्माला येतांबरोबर त्याला 'आदिमळ' लागलेलाच असतो. पुढें निरनिराळ्या देवतांच्या कक्षेंत तो जसजसा येतो तसतसे त्याला निरनिराळे' मळ ' लागतात. शेवटीं त्याला ' मृत्तिका मळ ' लागला

म्हणजे तो प्रपंचाच्या पूर्णपणें पाशांत सांपडतो. हें ' मळ ' उजळण्यांतच त्याची मुक्ति आहे. पहा : " जन्मलासातां जीव क्षणपर्यंत सुख असे : मग मैळे ॥ १२ ॥ चैतन्य मृत्तीकापर्यंत मैळे ॥ १३ ॥ " इत्यादि (संसरण. प्रकरण १६ वें.) असा हा थोडक्यांत सिद्धांत आहे. विशेष स्पष्टीकरणासाठीं जिज्ञासूंनीं श्रीसिसू मधील 'संसरण' प्रकरण व त्यावरील टीका पहाव्या.

४९८. जीव हा मायेच्या आधीन असतो ( 'जीव मायेसि आधीन होए कां प्रपंचासि : ' संसरण ११ ) व तिच्याच प्रेरणेनें तो प्रपंचरचना करतो ' मायाशक्तीच्या सामर्थ्यानें ज्याप्रमाणें कांतीण सृष्टी रचते त्याप्रमाणें जीव देखील मायेच्या साह्यानेंच प्रपंचरचना करतो ' हें मी कांतिणी जवळून शिकलों, म्हणून तिला गुरु केलें.

### प्र० ५७

५०७. मदनाच्या चोररस्त्यावर मन हाच चोर लपून बसतो व प्रेमाच्या तीक्ष्ण शस्त्राच्या साह्यानें तो जीवांना खालीं लोळवतो—घायाळ करतो.

५०८. इंद्रियेंच आपणहून विषयोपभोगांवर तुटून पडतात, शेवटीं त्या पापाचा लेप ( लाग—संबंध ) आत्म्यावर (जीवाला) पावे (लागतो); द्वारांठी—दारवंठा; दारवठा, उंबरा असाही अर्थ घेतां येणें शक्य आहे.

५१०. घटियंत्राच्या व्यवस्थेंत, पाण्यानें भरलेल्या मोठ्या भांड्यांत एक सच्छिद्र घट ठेवलेला असतो. खालील छिद्राच्या द्वारें त्या घटांत पाणी येतें. तो घट पूर्ण भरून बुडला म्हणजे एक घटिका झाली हें दाखवण्यास तास (जेंगट) वाढवितात. या क्रियेंत ज्याप्रमाणें पाणी घटाला प्यावयास मिळतें पण मार मात्र जेंगटाला बसतो त्याप्रमाणें मनुष्याचीं इंद्रियें पापें करतात पण त्यांचें फळ मात्र त्याच्या आत्म्याला भोगावें लागतें, असा भावार्थ.

५१२. ज्या शरीरासाठीं कुटुंबरुपी पर्वताची यातायात (कुटुंबाचें पर्वताएवढें दुःख) सहन केली.

### प्र० ५९

हें प्रकरण भाग ९—२९ या एकाच श्लोकाच्या आधारें लिहिलें आहे.

५१४. **जिविताचिया लाह्या**—जीविताची ( जिवंत असण्याची )

लाहा ( आशा) जोंपर्यंत आहे तोंपर्यंत; मृत्यु येण्यापूर्वीच या मनुष्यदेहाचा योग्य तो उपयोग करून घे.

५१८. वृक्षसर्पादि चौऱ्यांयशी लक्ष योनींमध्यें मनुष्यदेह हा सर्व श्रेष्ठ होय. भाग. अ. ९ श्लोक २८ पहा.

५२१. प्राण कंठाच्या ठिकाणीं असतात; म्हणून काळ जणुं कांहीं चोरखाचरूपी ल्वणांत लपून बसतो व वळितपळित हेंच ताडन, तें घाली (घाल: घालून ताब्यांत घेतो, आपली—मृत्युची कळा त्यावर पसरवितो) पण इंद्रियरुपी पिशाच्चावर मात्र हल्ला करीत नाहीं. सारांश, मनुष्य म्हातारा झाल्यावरही त्याचीं इंद्रियें विषयासक्त असतात. **हाडाळे** ऐवजी **हाउळीं** (समूह) असा पाठ कांहीं प्रतींत आढळतो. तोही वाईट नाहीं.

५२५. **विण सूर्या** (सुरिया) सुरीशिवाय.

## प्र० ६२-६३

५३१. **खुतले** (दिलेले) **रंग**—एखाद्या रत्नावर खोटेंच पाणी चढवलेलें असले तर;

५३२. राजकुमारांनीं जर लढाइची संवय ठेवली नाहीं तर;

५३६. पहा: 'प्रमाण दिवेयांचेनि बंबाळें: पातां तरळैले वेदांचे डोळे.' शि. ९

५३७. **योगशास्त्र:** पतंजलि मुनीनें प्रतिपादिलेलें मोक्षप्राप्तीचें एक साधन. **सांख्य:** कपिल मुनीचें द्वैतप्रतिपादक शास्त्र.

५३८. सर्व शास्त्रां जवळ तुझ्या ज्ञानाचें मंथन (लोणीं) घेण्याचा प्रयत्न केला, प्रत्येक शास्त्राचें मंथन करून तुझें ज्ञानरुपी नवनीत काढण्याचा यत्न केला, हा भावार्थ.

## प्र० ६४

५४२ अन्यथा—धर्माचें ज्ञान हीच अवदशा निवर्ते व ब्रह्मसुखाची नवल (आश्चर्यकारक) दशा उदैजे.

५४३ ईश्वराचें ज्ञान हाच खरा डोळा साधकाला मिळाला म्हणजे देवतेचा ठसा असलेलें नाणें तो फेंकून देतो आणि परब्रह्म हाच तुझा आगळा (ज्याचें माप करतां येत नाहीं असा) टाक (नाणें) तो घेतो.

## प्र० ६६

५४७. **दळाचीं जालीं**–बरदळाचीं–वर्ख लावलेलीं–मुलामा चढवलेलीं अर्थात् खोटीं निघालीं.

. ५४८. शक्ति (देवता) चक्र जणुं तांब्याचा किंवा पितळीचा पत्रा आहे. तो क्षुद्रानंदरुपी पिठानें स्वच्छ घासला गेल्यानें चकाकतो एवढेंच. पण चकाकतो म्हणून तो सोनें नाहीं.

५५१. **षड्गुण**–१२५ व्या ओवीवरील टीप पहा.

## प्र० ६८

सृष्टीमध्यें परमेश्वराशिवाय इतर कोणीही ( देवता वगैरे. प्र. ६६ व ६७ पहा ) जीवांस तारूं शकत नाहीं असें महानुभावांचें मत आहे ('सृष्टीमध्यें कव्हणें करणें मुचिजेना एकें परमेश्वरें वीण.' श्रीसिद्ध. पूर्वी) त्याचप्रमाणें ते द्वैतमताचे अनुयायी आहेत. महानुभावपंथ स्थापन होण्यापूर्वी सर्वत्र प्रचलित असलेल्या 'सर्वं खल्विदं ब्रह्म'चा पूर्वपक्ष या ठिकाणीं करून पुढील प्रकरणांत भास्करानें त्याचें खंडन केलें आहे व द्वैताचें मंडन केलें आहे.

## प्र० ६९

५६४. ब्रह्म हेंच अविद्येमुळें जीवस्वरुप धारण करतें असा अद्वैत्यांचा सिद्धांत. पण ब्रह्म हें जर शुद्धबुद्ध आहे तर तें अविद्येनें बद्ध कसें होऊं शकेल ? (ओवीचा उत्तरार्ध) असा श्रीकृष्णाचा प्रश्न. एकाच परमेश्वराच्या ठायीं नित्यमुक्तत्व आणि नित्यबद्धत्व हे परस्परविरोधी गुण आहेत हें म्हणणेंच असंबद्धपणाचें आहे. म्हणून जीव–ब्रह्मांत अभेद मानतांच येत नाहीं (५६५). महानुभावांच्या मतें जीव हा नित्य आहे हें येथें लक्षांत ठेवावें (२९३ ओ. वरील टीप पहा.)

५६६. जीव–ब्रह्मांत अभेद असूं शकत नाहीं. हें दाखविण्यासाठीं या ठिकाणीं तीन प्रश्न उपस्थित केले असून प्रकरणाच्या पुढील भागांत त्यांचीं उत्तरें कवीनें दिलेलीं आहेत. हे प्रश्न असे. (१) जीव आणि ब्रह्म एकच आहेत म्हणून त्यांत अभेद मानायचा काय ? (२) कीं जीव आणि ब्रह्म

भिन्न असून नंतर केव्हांतरी, त्यांचें ऐक्य होतें असें मानावयाचें ? (३) कीं त्यांत भेद नाहीं म्हणून अभेद मानायचा ? पहिल्या चरणांत **अभेदु** हा द्द प्रतीचा पाठ स्वीकारला पाहिजे.

५६७. जीव आणि ब्रह्म एक असूं शकत नाहींत. कारण जीव अनेक आहेत पण ब्रह्म मात्र एकच आहे.

५६९–५७२. जीव ब्रह्म भिन्न असून त्यांत ऐक्य स्थापन होतें. या पूर्वपक्षाच्या म्हणण्यावर दोन प्रश्न संभवतात. या दोघांचें ऐक्य, त्यांचा नाश न होतां होतें कीं नाश झाल्यानंतर होतें ? दोघांचाही नाश होऊन ते एक होतात काय ? (५६९) काच (जीव) व माणिक (ब्रह्म) हे स्वयं-संपूर्ण व नित्य असल्यामुळें, त्यांचा नाश होण्यापूर्वी त्यांत ऐक्य होऊंच शकत नाहीं (५७०) आणि समजा त्यांचा नाश झाला तर ? तर ऐक्य कोणांत व्हावयाचें ? धर्मिये (ज्यांत ऐक्य व्हावयाचे ते पदार्थ) नष्ट झाल्यामुळें ऐक्य होणेंच शक्य नाहीं. (५७१) भेदाचा अभाव म्हणून ऐक्य आहे असें मानणें चुकीचें आहे. दोन वस्तु अगदीं तंतोतंत सारख्या असल्या म्हणून त्या एकच आहेत असें मानतां येत नाहीं.

५७४. ‘ जैसें ज्ञानाभाव आज्ञान म्हणजे ज्ञानाचा आभाव जाला आन आज्ञान आलें : तें बोल्लतां=सांगतां : वेगळें नव्हे=अज्ञानावेगळें ज्ञान नाहीं आन ज्ञानावेगळें अज्ञान नाहीं ऐसें जरि म्हणितलें तरि परम व्यावृती : अज्ञान व्यावृत्तावया : परम जें ज्ञान तें नीरूपूं नये=जेंचि ज्ञान तेंचि अज्ञान तरी कां नीरूपावें : एवं ज्ञान वेगळें : तें ईश्वराचें : आन अज्ञान वेगळें : एवं जीवाचें : म्हणौनि ज्ञानें अज्ञान फीटे ’ ( टीप ).

## प्र० ७१

५७८. जीव ब्रह्मावेगळा नसून ब्रह्मच आहे. फक्त अविद्येमुळें (मायेमुळें) एकच ब्रह्म नाना जीवांच्या रूपानें दृश्यमान होतें, ही उध्दवाची आशंका (हें वेदांत्यांचें मत आहे). तिचें निरसन ७२ व्या प्रकरणांत केलें आहे.

प्र० ७२

५८०-५८२. ब्रह्म हें निराकार व निरवयव असल्यामुळें मायेला (अविद्येला) त्याचे तुकडे पाडतां येणें अशक्य आहे. माया जर निरवयव ब्रम्हाचीं शकलें करूं शकेल तर परमाणूंमुळें निराकार आकाशाचेही तुकडे पडतात असें मानावें लागेल ! पण हें चुकीचें आहे. (५८०) निराशे ('निष्ठा करावेया शक्य नव्हे '=अभावरूप) अशा अज्ञानांत (मायेंत) अमूर्त (निराकार) ब्रह्माचें प्रतिबिंबही पडूं शकत नाहीं. त्यामुळें अनेक जीव म्हणजे एकमेव ब्रह्माचीं प्रतिबिंबें आहेत हें म्हणणें योग्य नाहीं. अनेक अभावरूप दिशांनीं अविच्छिन्न राहणाऱ्या अनंत काळाचा दृष्टांत उदाहरणादाखल घेत लेला आहे (५८१). पुढील ५८६ ओवी पहा. अविद्या हीच विणकर अथवा हातमाग(विणावणी), तिच्यामुळें ब्रह्मावर प्रपंचरंगाचे (जीवरूपी) अनेक ठसे अथवा वाण=संगमें(वर्णि) पडतात (पढति) असें म्हणूं नकोस.(५८२).

५८३. परिणाम वाद-प्रत्येक कार्याला कोणतें तरी कारण असलेंच पाहिजे. कारणावांचून कार्य संभवतच नाहीं. इहजन्मींच्या सुखदुःखांना देखील पूर्वजन्मींच्या पापपुण्याचें कारण असतेंच; अशा अर्थाचा सिद्धांत. विवर्तवाद-विवर्त=अज्ञानजन्य भ्रांति, जग हें मिथ्या आहे, 'तें मुळीं उत्पन्नच झालेलें नाहीं. हें जें दिसतें आहे तो सगळा भ्रम आहे, रज्जूवर भासणारा सर्प किंवा वाळवंटावर भासणारें मृगजळ, हीं जशीं खोटीं त्याच-प्रमाणें ब्रह्मावर आभासमान होणारें जग केवळ मायारूप होय'या अर्थाचा सिद्धांत.

प्र० ७३

५८५. सोपानः सोप्या रीतीनें; अथवा, जीव-ब्रह्माच्या भेदाचा सोपान (मार्ग) जगदिश्वरु कैसें निरूपिता जाला तें सांगेन.

५८६. पूर्वपश्चिमादि अनेक रुपांनीं ओळखल्या जाणाऱ्या दिशांप्रमाणें जीव आहेत व अनंत काळाप्रमाणें ब्रह्म आहे.

५८८. मागें ४९७ वरील टीप पहा. जीव शुद्ध असला तरी जन्माला आल्याबरोबर त्याला आदिमळ लागतो व नंतर निरनिराळ्या देवतांचे मळ लागतात असें महानुभाव मानतात.

५९१. प्रकृति (माया) रूपी रजस्वलेशीं देखील हा (जीव) नेहमीं क्रीडा करींत असतो.

## प्र० ७४

५९३. भाग. अ १०–३५-३७ पहा.

५९४. नक्षत्रांच्या भैरव-गुंड्याची व चंद्रसूर्यरुपी हातखोड्याची प्रकृती-मायेशीं तुलना केलेली असून हुडा व काळ यांची तुलना जीवाशीं केलेली आहे. नक्षत्ररुपी दगडांनीं आकाशरुपी बुरुज कोसळून पडत नाहीं, किंवा चंद्रसूर्य हे आपल्या उदयास्तरुपी खोड्यामध्यें काळाला टाकूं शकत नाहींत (चांद्रमान आणि सौरमान हे काळ मोजण्याचे दोन प्रकार आहेत ते येथें लक्षांत घ्यावे) वगैरे; त्याप्रमाणें निराकार जीवाला माया–प्रकृति आपल्या बंधांत कशी घालते व जीव प्रपंचाचा गळफास कसा लावून घेतो ?

६००. मायेच्या अंगणाच्या आधारानें (मायेच्या अंगणांत); मोहरुपी तुरे वाजत असतांना;

६०१. जीवानें धारण केलेलें ( आवगतें) अंग (सोंग, नटवेष) तो चैतन्याच्या घरांत धुतो(निर्वाळे)मायेचें पाणी आपल्या अंगावर घेतां, देहधारण केल्याबरोबर जीवाला मायेचा(चैतन्याचा)आदिमळ लागतो व त्याच्याच साह्यानें त्या निराधार(स्वतः कर्तृत्वहीन असलेल्या)जीवाला प्रपंच निर्माण करतां येतो,

६०२. ‘ तरि तो सोंग कैसें घे : अव्यक्ताचा (चैतन्य मायेचा) वर्तु सारी=उटी घे : तल्लक्षेण आदिमळ : ॥ : महंतत्व=कारणाचीं भुतें : खुल ते डोळेयाचीं : तल्लक्षेण विश्वमळ : ॥ : चोखाळ=चोखट : दांतिरी=सींपीचे दांत लावीती : तल्लक्षेण आष्टभैरवाचे मळ : पंचभूताचीं=समळासहीत’ (टीप)

६०३. ‘ भरी=लावी : तनु=लींगदेह : मात्रें शब्दें सानें : यथा शेष-शय्याब्रह्मादिकांचे मळ : तल्लणेक्ष लोंव = आंगादि केश लावी : तथा दाढीमीसी लावी तैसें : लें वीषयाचें ढीव = इंद्रादिका खालुते पासौनि समस्तीचे मळ तल्लक्षेण (ढीव) = अळंकार : ते पतिळेचे : तथा बेगड : भावें कथीलाचे : तैसें मळहीन : अवगती=सोंग घेती बरव : तोचि=जीवाचि

जाणे :, (टीप) महानुभावांच्या मतें आदिमळ, विश्वमळ, प्रकृतिमळ, (अष्ट-भैरवाचे), विकृतिमळ (शेषशय्यादिकांचे), व विकृतिविकृतिमळ (इंद्रादि देवतांचे), असे अनेक मळ घेतल्यावरच जीव प्रपंचानिर्मिती करूं शकतो. या अनेक मळांवर, नटाच्या निरनिराळ्या नेपथ्यरचनेचीं रूपकें वरील दोन ओव्यांत केलीं आहेत.

## प्र० ८२

६२२. **जेवि**: जेवतो, सेवन करतो. **सेवि** पाठ अधिक प्रशस्त आहे.

६२४. बाहिऱ्यांच्या जागेंत कोकिळांचा रंजविणारा आवाज व्यर्थ होतो (उपखे). **कमळ** : सूर्यविकासी; चंद्राच्या किरणांनीं कमळ म्लान होतें.

## प्र० ८४

६३१. '**चोरथरें**=चोरमोळे' चोपडें नाणें व म्हणून न चालणारें. **न सरे**= न चाले.

६३३ **सुवेचपणें**—योग्य रीतीनें.

६३४. गहाण वगैरे न घेतां अंगावर कर्ज देत असतात(Personal debt) **मनु** : एक राजा, यापासूनच सर्व 'मानवां'ची उत्पत्ति झाल्याचें मानतात. **भृगु** : मनूनें निर्माण केलेल्या दहा प्रजापतीपैकीं एक ऋषी.

६३५. **एक** ऐवजीं **येर** असा पाठभेद कांहीं प्रतींत आहे व तोच अर्थदृष्ट्या चांगला आहे." मी दिलेल्या ज्ञानाचा विश्वानें नाश केला. शिल्लक राहिलेल्या वाल (गुंज) भर ईश्वरज्ञानरुपी सोन्यांत येर (देवतांचें) कर्म (कर्मकांड)रूपी कथिलाचा चूर (खुरा) टाकून त्याचें मिश्रण तयार केलें. आणि त्यावरच 'ब्रह्मविद्या' असा खोटाच ठसा मारला. सारांश पर-ब्रह्माचें ज्ञान फार थोडें असून कर्मकांडाचेंच ज्यांत फाजिल स्तोम माजलें अशा धर्मालाच लोक 'ब्रह्मविद्या' म्हणूं लागले."

६३६. राजस आणि तामस गुणांच्या देवतांच्या आराधनानें निर्माण झालेली सांजवेळ. (या वेळेला अंधार असल्यामुळें ब्रह्मविद्येचें खोटें नाणें सहज चालवितां येतें) अशा वेळीं ती खोटी ब्रह्मविद्या फलश्रुतीची भाषा

बोलूं लागली. अमक्या देवतेला .बळी वगैरे दिला तर पुत्रदारादि प्राप्त होतील अशी देवताभक्तीची फलश्रुति सांगितली जाऊं लागली. असे हे चोरमोळे (खोटे,बनावट) निवृत्तिमार्ग (मोक्षाचे उपाय) मन्त्रादिकांनीं सारिले (स्थापन केले)

६३७. ' लय : मनें करूनि अंत:करणीं स्मरण : एवं टाळी''लक्षः दृष्टी बाहाद्दुनि पाहणें' लयलक्षादि धारें (कर्मप्रतीचीं) ज्ञानें; अथवा लय-लक्षांना आधार (आश्रय देणारीं) असलेलीं ज्ञानें;

६३८. वेधवंती (प्रेमशक्ती) तिची, बोळग (सेवा) वारिली. तिची देखील सेवा स्वीकारली जात नाहीं. केवळ–भक्ती कामाची नसून मोक्षप्राप्ती-साठीं ज्ञानोत्तर भक्ति पाहिजे असा महानुभावांचा सिद्धांत आहे.

६३९. इष्ट : एकाग्निकर्महवनं त्रेतायां यच्च हूयते । अंतर्वेद्यां च यद्दानं इष्टं तादिष्टमाभिधीयते ।। पूर्त : वापीकूप तडागादि देवतायतनानिच । अन्नप्रदानमारामा:पूर्तमर्थ्याः प्रचक्षते ।।

६४०. मुक्तीच्या राउळांत तीर्थव्रतांना जागा नाहीं. तेथिचा कैवाडु (कोडें) धर्मजातांस नुगवे (सोडवितां येत नाहीं); अथवा, तेथिचा (मुक्तीच्या राउळांतील) कैवाड=कैवार, धर्मजातांस मिळत नाहीं. यांचें त्याठिकाणीं कांहींच वजन नाहीं.

## प्र० ८५–८६

६४३. " स्वर्गांचे एकवीस पुरे : तेचि एकवीस स्वर्गं : दुसरें : स्वर्ग एकवीस=सप्तपाताळ:७ : इंद्रलोक : ८ : सूर्यलोक : ९ : चंद्रलोकः १० : मृत्युलोक : ११ : सत्यलोक : १२ : वैकुंठ : १३ : कैलास : १४ : शेष : १५ : अष्टभैरवांचें स्थान : १६ : विश्व (?) : १७ : चैतन्य : १८ : तथा खालौतीं तीन्हीं (?) ऐसीं एकवीस स्वर्गं "( टीप.)

६४४. पडप–त्यागी ( देणारे ).

६४५. ' बोरा= लाल खडा : सगात्र=मोठा : तथा घन : सेंदुरा= आलोहीत : उद्धातेया=प्रभा फांकतेया : रंगाचे हीर : मानकुला=माणीकाचां ठाइं कीळ आसति ' (टीप) यांत उल्लेखिलेले अंबाडापुर कोणतें ? ( बुल-

डाणा जिल्ह्यांत एक 'अमडापुर' नांवाचें गांव आहे, तें तर नव्हे ?) येथें लाल खडे सांपडत असावेत; टीपकारानें 'मानकुल=माणिक' व 'रंगाचे हीर= रंगीत प्रभा–किरण' असे अर्थ घेतलेले आहेत. पण 'हीर=हिरे व 'मानकुल= हिऱ्याची खाण असलेलें एक गांव' असाही अर्थ घेतां येण्यासारखा आहे.

६४७. यमकाच्या दृष्टीनें **सारिका हा गद्य** प्रतींतील पाठ चांगला आहे.

## प्र० ८६

६५७. ज्या शक्तीच्या रोमरंध्रांत देखील अनंत ब्रह्मांडें वास करितात.

६५८. चंद्रसूर्यादि मापांच्या साह्यानें काळ ज्या स्वरूपाचें माप (उमाणें) करूं शकत नाहीं; ज्याची आयुष्य मर्यादा काळालाही ठरवितां येत नाहीं असें अनादि अनंत स्वरूप; दशदिशा हींच द्वीपें.

६५९. **आवर्णोदक**: त्रिभुवनाच्या भोंवतीं असलेलें पाण्याचें आच्छादन.

६६०. 'ब्रह्मलक्षणें काश्मिर जो पाषाण : तयाची बुढीं : भूशिळा : चैतन्य=अव्यक्त माया : तल्लक्षेणं पींडि=खालील शिळा' ब्रह्म हींच स्फटिकाची पिंड, तिला आधार म्हणून चैतन्याची पींडि (शाळुंका) पुरत नाहीं हा भावार्थ; येथें पिंड शब्द 'शाळुंका' अर्थानें घ्यावा लागतो.

६६२. '**मलय पांचौर**—कापुरः कस्तुरीः जवादः केशरः चंदनः ऐसे पांच परीमळः आहेति ज्या तुझा ठाइं (?)' टीप.

६६३. **पर** (ईश्वर)+**ज्ञान**: ईश्वराचें ज्ञान.

## प्र० ८८

६६८. असोदरच ते ज्ञानसंपन्न, त्यांत प्रत्यक्ष ब्रह्मदेव हा त्यांचा पिता; असें असल्यावर तुझ्या उपदेशाचा विषय (स्थान) केवि झाले ? त्यांना तुझ्याजवळून उपदेश घेण्याचें वास्तविक कारण नाहीं मग असें कां झालें ?

## प्र० ८९

६७०. पहा–गुणेष्वाविशते चेतो गुणाश्चेतसि च प्रभो। कथमन्योन्यसन्त्यागो मुमुक्षोरतितितीर्षोः॥ (भाग. १३–१७) **गुणचित्ताची वेणी**–गुण

(रूप, रस, गंध, स्पर्श व शब्द) हे चित्तांत नेहमी असतात व चित्त यांच्या ठिकाणीं असतें; गुणचित्त हीं परस्परांवर अत्यासक्त असतात. एकमेकांपासून त्यांना वेगळें करतां येत नाहीं, पुढें ६८२ वी ओवी पहा.

६७१. पहा—त्या प्रश्नाची प्रश्नोत्तर विधी। ब्रह्मयासी न कळे त्रिशुद्धि। कर्मजड झाली बुद्धी। बोधकसिद्धी स्फुरेना ॥ ए. भा. १३–२८१. जग निर्माण करून, कर्मकांडरूपक प्रवृत्तीचा धुरळा डोळयांत गेल्यामुळें प्रश्नाचें उत्तर देण्याचा खरा मार्ग त्यास दिसेना.

६७३. गरा प्रतींतील **भुजंकु** हाच पाठ प्रशस्त आहे. मूळ पाठ कायम ठेवला तर 'केतकीचा खरा भ्रमर (वास—उपभोग घेणारा) भुजंग (सर्पच) होय. असा अर्थ करावा लागेल. केतकीच्या बनांत नाग फार असतात हें प्रसिद्धच आहे.

## प्र० ९०

६७७. हंसाला पाहून सनकादिक क्षोभले, असें वर्णन मुळांत नाहीं. उलट 'दृष्ट्वा मां त उपव्रज्य कृत्वा पादाभिवंदनम्। ब्रह्माणमग्रतः कृत्वा पप्रच्छु को भवानिति ॥ अ. ३०–२०' असें भागवतांत आहे.

६८५. 'योगः ज्ञानयुक्त वैराग्य' (टीप)

६८६. 'चोळा: चोळेचा रंग'(टीप) एक रंग, **काले देणें**=पुटें देणें

## प्र० ९१

६८७. या **अनंत सिद्धी.** भाग. अ.१५ मधें खालीलप्रमाणें दिल्यां आहेत. सिद्धयोऽष्टादश प्रोक्ता धारणा योगपारगैः। तासामष्टौ मत्प्रधाना दशैव गुणहेतवः ॥३॥ अणिमा महिमा मूर्तेर्लघिमा प्राप्तिरिन्द्रियैः। प्राकाम्यं श्रुतदृष्टेषु शक्तिप्रेरणमीशिता ॥ ४ ॥ गुणेष्वसंगो वशिता यत्कामस्तदवस्यति। एता मे सिद्धयः सौम्य अष्टावौत्पत्तिका मताः ॥५॥ अनूर्मिमत्त्वं देहेऽस्मिन्दूरश्रवण दर्शनम् ॥६॥ स्वच्छन्दमृत्युर्देवानां सहक्रीडानुदर्शनम्। यथासंकल्पसंसिद्धि- राज्ञाऽप्रतिहता गतिः ॥७॥ त्रिकालत्वमद्वद्वं परचित्ताद्यभिज्ञता। अग्न्यर्काम्बु- विषादीनां प्रतिष्टम्भोऽपराजयः ॥८॥

६८९. चंद्रिकेव्यतिरिक्त इतर सर्व गोष्टी चकोराला तुच्छ वाटतात. त्याप्रमाणें ब्रह्मानंद खेरीज करून इतर सुखें योग्याला तुच्छ वाटली पाहिजेत.

६९०. **नाद्मिनी जाति**–पद्मिनीच्या जातीची.पद्मिनी स्त्रीचें वर्णन असें केलें आहे 'भवति कमलनेत्रा नासिकाक्षुद्ररंध्रा अविरलकुचयुग्मा चारुकेशी कृशांगी। मृदुवचन सुशीला गीतवाद्यानुरक्ता सकलतनुवेषा पद्मिनी पद्मगंधा.॥

६९३. पहा. भाग १६–६ व या पुढील श्लोक विभूतिविस्ताराचे. वर्णन करणारे.

६९६. सर्व भूतें (अथवा त्यांचीं अंतःकरणें) हींच शय्या, त्यावर विश्रांति घेत असलेलें; तेथें निवास करीत असलेलें चैतन्य.

६९८. **सात पाताळः** अतल, वितल, सुतल, रसातल, तलातल, महातल आणि पाताल.

## प्र० ९५

७०२. ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास हे चार आश्रम.

७०४. पुष्कळ प्रकारच्या (विचित्र) क्रिया; त्यांचा कलाप–समूह. ब्रह्मसुखाच्या पुलाप्रमाणें शोभणारें स्वर्गसुखच आश्रमयुक्त प्रवृत्तिमार्गाच्या आचरणानें मिळूं शकतें. अर्थात् स्वर्गसुखापेक्षां ब्रह्मसुख अनंत पटींनीं श्रेष्ठ असल्यामुळें, प्रवृत्तिमार्गानें तें साध्य होऊं शकत नाहीं. तें प्राप्त होण्यास ज्ञानपूर्वक संन्यासच घेतला पाहिजे हा महानुभावांचा सिद्धांत आहे. याचेंच वर्णन 'मोक्षधर्म' म्हणून पुढील प्रकरणांत कवीनें केलें आहे.

## प्र० ९६

७०५. **परावरेश** पर (ईश्वरासंबंधींचें ज्ञान)+अवर (अलिकडील–जगासंबंधींचें ज्ञान) यांचा ईश. महानुभावांच्या पंचकृष्णापैकीं कांहींचा परदृश्यावतार, कांहींचा अपरदृश्यावतार तर कांहींचा परावरदृश्यावतार (उभयदृश्यावतार) मानिला आहे. श्रीकृष्णाचा उभयदृश्यावतार होता.

## प्र० ९७

भागवत अध्याय १९–११ वा व पुढील श्लोक पहा. त्यांच्याच आधारें हें प्रकरण लिहिलें आहे.

७१०. पहा : निवृत्ते भारते युद्धे सुहृन्निधनविह्वल :
श्रुत्वा धर्मान्बहून्पश्चान्मोक्षधर्मानपृच्छत ॥ १९–१

७१२. **ईषणात्रय** : लोकेषणा; (वित्तषणा) दारेषणा व पुत्रेषणा.

७१६. भिक्षूच्या अंगीं क्षमा जशी पूर्णपणें बाणली होती तशी संन्याशाच्या अंगीं बाणली पाहिजे. या भिक्षूची कथा भागवताच्या २३ व्या अध्यायांत वर्णन केलेली आहे. तिलाच ' भिक्षुगीता, असें दुसरें नांव आहे.

## प्र० ९९

७१८. भिक्षूचें नांव लुब्धपाणी असल्याचें भागवतांत नाहीं. 'वार्ता-वृत्तिःकदर्यस्तु कामी लुब्धोऽतिकोपन : ' (२३–६ ) यांतलि लुब्ध या विशेषणाच्या आधारानें भास्करानें भिक्षूला लुब्धपाणी हें नांव स्वतः दिलेलें दिसतें.

७१९. आलुकेया (पैश्याला) आंगवणें(स्वाधीन) होऊन ठेला (राहिला)

७२०. 'कदर्यात रणी' असाही पदच्छेद करणें शक्य आहे.

७२१. उलट( पुण ) तो लुब्धपाणी त्यांनाच ( त्यांजजवळच ) कवडे याचीं (कवड्या सारख्या क्षुद्र वस्तूंची देखील याचना करीत असे ) म्हणून ते याचक निन्मुख होऊन जात असत.

७२३. **अवसरा चुके**: वेळेवर पाऊस पडला नाहीं तर.

७२५. घरीं अतिथींना पाणी देखील प्यावयास देत नसे. इतरांच्या पाण्याची गोष्ट तर राहोच पण घरच्या, लोकांना अन्नाची (वरोचें) देखील याचना करावी लागत असे.

७२६. शिपाई पाठवून होती नव्हती तितकी सर्व संपात्ति राजानें नेली; अथवा, नव्हती (भलतेच; नसलेले) बाधकें (दोष, अपराध) ठेवून (माथीं लादून) राउळें सर्व संपात्ति नेली. मूळांत केवळ राजानें सर्व संपात्ति हरण केल्याचा उल्लेख नसून 'ज्ञातयो जगृहुः किञ्चित् किञ्चिद्दस्यव उद्धव । दैवतः कालतः किञ्चिद्ब्रह्मबन्धोर्न्टपार्थिवात् ॥ २३–११' असा उल्लेख आहे. टीपकारानें पहिल्या चरणाचा अर्थ 'नव्हतें अन्यायें: एवं गाइचां कोठां लघु-संका केली' असा दिला आहे. **त्रिदंडी** 'वाग्दंडोऽथ मनोदंडः कायदंडस्तथैव

च । यस्यैते निहिता बुद्धौ त्रिदंडीति स उच्यते' ॥ त्रिदंडी संन्याशाला गृहस्थाश्रमांत पुन्हा येण्याचा अधिकार असतो.

७२७. **प्रलंबपुर**—मूळ भागवतांत भिक्षु प्रलंबपुरास गेल्याचा उल्लेख नाहीं. एकनाथ महाराज 'ऐसा विचरतां पृथ्वीसी। अवचटें आला अवंतीसी।' २३–५०१ असें म्हणतात. टीपकार 'प्रकर्षेसी आलिंबन ते प्रलंबापुरः एवं दुर्जनाचें नगर' असा अर्थ देतो.

७२८. **परी आननीं**: निरनिराळ्या रीतींनीं (आनानीं)

७२९. पहा : नायं जनो मे सुखदुःखहेतुर्नदेवतात्मा ग्रहकर्मकालाः।
मनः परं कारणमामनन्ति संसारचक्रं परिवर्तयेद्यत् ॥ भा.२३–४३

## प्र० १०० त २०१

७३५. आतां तुला मोक्षधर्म सांगतों असें श्रीकृष्ण येथें म्हणतात. पण पुढें एकदम उद्धवाचा प्रश्न आहे. त्यावरून श्रीकृष्णानें मोक्षधर्म निरुपण संपविलें असें वाटतें. तसें असल्यास 'सांघेन' या ठिकाणीं भूतकाळीं क्रियापद असावयास पाहिजे.

७३७. **महुर** : खारक्या नागाचें विष ( टीप). अर्थात् विषयरूपी. महुर याचा मधुर हा अर्थ प्रसिद्ध आहे. तो घेऊनही अर्थ लावतां येईल.'विष हें केवळ मधुर असल्यामुळें (महुरें, माधुर्याला भुलून)तें तो पितो;असें कां ! '

## प्र० १०२

७३९. विषयांकडे आपणहून आवेशानें चालत जातो;त्यांच्या पाशांत सांपडतो.

७४०. **पुरुरवा**—ऋग्वेद मं. १० सू. ९५ मध्यें पुरूरव्याची कथा आलेली आहे. हा ईल राजाचा पुत्र.

७४१. पहा : ' उर्वशी स्वर्गभूषण । नारायणें धाडली आपण । तो उर्वशीसी गर्व पूर्ण । श्रेष्ठपण मानूनी ॥ तया गर्वाचिये स्थिति । ताल चुकली नृत्यगती । तेणें ब्रह्मशापाची प्राप्ती । तुज मानवी हो गती भूतळीं ॥ उःशाप मागतां तिसीं । ब्रह्मा सांगे लियेपांशीं । नग्न देखिल्या पुरूरव्यासी । स्वर्गा

येसी निमेष मात्रें ॥ ए.भा.२६–५८, ५९; ६० उर्वशी राजाची भोगपत्नी झाली तेव्हां 'नग्न देखिलिया रायासीं । सांडूनि जावें उर्वशी ॥ असा त्यांच करार झाला होता.

७४५. मातें (मला, माझ्यासाठीं) पारुष ( थांब ).

७४६. स्त्री ही कौळिक (मोह घालणाऱ्या मांत्रिकाप्रमाणें कपटी) आहे हें जाणल्यानंतर; ती वैसीक (वश करणारी;) अथवा विषयात्मक किंवा वेश्ये-प्रमाणें केवळ विषयोपभोगासाठीं–प्रेमानें नव्हें–तुमच्याजवळ राहत होती हें ओळखल्यानंतर,शहाण्या लोकांना तिच्याशीं बोलणें देखील लाजिरवाणें वाटतें; (आणि पुरूरवा तर नग्न स्थितींत तिच्या मागें धांवत होता. यावरून तो उर्व-शीच्या पाशांत कसा पूर्णपणें सांपडला होता–किती कामासक्त झाला होता हें दिसून येतें.)

७४५. एकदां मन विटून दोन व्यक्तींतील प्रेम नाहींसें झाल्यावर प्रत्यक्ष ब्रह्मदेव आला तरी त्यांची मैत्री पुन्हा घडत नाहीं.

७४८. जात (जात असतांना, शेवटीं) देखाचि ना; ती जातां जातां दिसेनाशी झाली.

७५४. इचा मस्तक आणि तळ (पाय) मी पाहिला नाहीं. इला नखशिखांत पाहिलें नाहीं. म्हणूनच मी भ्रांत झालों. इच्याकडे विचारपूर्वक दृष्टी फेंकली असती तर स्त्री म्हणजे मूर्तिमंत घाण आहे असें माझ्या ध्यानांत आलें असतें व मी कामासक्त झालों नसतों.

७५५. कपटाची परीक्षक. कपटाचे सर्व मार्ग इच्याजवळ असल्यामुळें कपटमार्गांत ही जाणती आहे.

७५६. मुक्तिमंदिरांत प्रवेश न करूं देणारें हें वज्रनिर्मित असें कवाड आहे.

७५७. कायं मलीमस: कायो दौर्गन्ध्याद्यात्मकोऽशुचिः । भाग २६-१८.

७५८. चामाचा भोकसा (चामड्याचा गवसणींत) थवथविता मांसा (रक्तबिंदू स्रवत असलेलें मांस) घातला (घातलें). पहा–त्वङ्मांसरुधिरस्नायु-मेदोमज्जाऽस्थिसंहतौ । विण्मूत्रपूये रमतां कृमीणां कियदन्तरम् ॥ भाग.२६–२१.

७५९. स्त्रियेचनि रुपें अस्थींचा पाश प्राणियांसि कैसा राचिला !

७६०. मांसाचा पिंड फाटक्या चामड्यानें (कांती) वेष्टिला (बोखाटिला); शरीराच्या चामड्याला फाटकें म्हणण्याचें कारण, तोंड, कान, नाक, गुद इत्यादि ठिकाणीं त्याला छिद्रें असतात. उत्तरार्धं; अशा घाणेरड्या स्त्री देहाचीं 'अहो हे सुंदर सुरेख। चंद्रवदन अतिसुमुख। सरळ शोभे नासिक। सुभग देख सुकुमार॥ (ए. भा. २७–२२७)' अशीं स्तुतिस्तोत्रें गाऊन धूर्ते (कावेबाज पुरुषांनीं) जगाला सपशेल फसविलें आहे.'

७६१. अस्थींचा समूह मज्जातंतूंनीं गुंडाळून त्यांत रक्ताचा सांठा घातला (ओतला)

७६४. **युक्ति विळासी** हा पाठ बरा दिसतो.

## प्र० १०३ व १०४

७६७. **मंत्र** मांत्रिक.

७७३. ' परा वाचा तल्लक्षेण बीजाक्षेर–रहस्यरूपी : पाचारूनि म्हणजे जोन्हळे पींवळे करूनि : आरण्यांत मंत्र टाकी : आन सर्प पाचारूनि गतप्राण मनुष्यापासि आणी : दाटी म्हणजे लहरी : उभारी म्हणजे सर्प उभारूनि बोलवी : ऐसें साहीत्य असे : तेणें जीव आत्मयाचें (परमात्मा विरूद्ध जीवात्मा) अवीद्या लक्षेण वीष उतरे' टीप. मांत्रिक सर्पविषानें मेलेल्या मनुष्याला जिवंत करण्यासाठीं मंत्र उच्चारून ज्यानें चावा घेतला असेल त्या सर्पाला त्या मनुष्याजवळ आणतो. व मग तो सर्प तें विष शोषून घेतो तेव्हां मनुष्य जिवंत होतो. अशी समजूत आहे.

७७५. गांठ मारलेल्या चिंध्या व दोऱ्या मंत्रांनीं भारून त्या सर्प चावलेल्या मनुष्याला बांधतात हें प्रसिद्धच आहे. सन्निधान हीच उत्तरी; कृपादृष्टीरूपी भारदोरी; ब्रह्मवासनारूपी तागाबंधु. **नागा(ग) बंधु** असा पाठ (श) घेतल्यास ' नागाला–सर्पाला बांधून टाकण्यासाठीं, पर्यायानें त्याचें विष उतरविण्यासाठीं, अभिमंत्रित केलेला दोरा.

७७६. **झाडणी**–सर्पविष उतरविण्यासाठीं मांत्रिक निंबाची डहाळी हातांत घेतात व तिनें सर्पविष जणुं कांहीं झाडून टाकल्या सारखें करतात.

कर्मत्यागाची झाडणी करून म्हणजे कर्मत्याग हीच निंबाची इहाळी मानून; कर्मत्यागरूपी झाडणीनें. **कर्मत्यागः** चतुर्विध कर्मांचा (स्वर्ग, नरक, कर्मभूमि आणि मोक्ष, पहा श्रीसिसू. पान ७ ) त्याग.

७७९. **रा रा** या शब्दांनीं आरंभ होणारा सर्प उतरवण्याचा एक मंत्र आहे. ईश्वराची करुणा हाच रारा मंत्र त्याच्या योगानें (करीं) मी जागच्या ठिकाणाहूनच जीवात्म्याच्या अंगांतील अविद्या नामक विष उतरवितों आणि या रीतीनें त्याची लहरी (दांटि) राखतो, सर्पाला ज्याप्रमाणें लहरी येतात तशा सर्पदष्ट जीवालाही येतात. सर्पाच्या लहरी जोंपर्यंत कायम असतात तोंपर्यंत जीव मरत नाहीं अशी समजूत आहे (म्हणूनच चावलेल्या सापाला मारत नाहींत) यावरून जीवाच्या अंगांत लहरी कायम ठेवणें म्हणजेच त्याला जिवंत ठेवणें ही कल्पना लक्षांत येईलच.

## प्र० १०५

७८२. जीव आणि ब्रह्माचें ऐक्य तेंच एकत्व. यासच मुक्ति म्हणतात.

७८३. मुक्ति हीच तांदळाची पेज; ज्या मुक्तिरूप पेजेंत तुझा आनंद रूपी दूध नाहीं त्या मुक्तीचें ओझें निष्कारण कोण वाहील ?

७८४–८५. महानुभाव द्वैतवादी असल्यामुळें जीवब्रह्माचें ऐक्य संभवनीय असलें तरी तें नको असें म्हणतात. कारण जीव हाच ईश्वर झाल्यावर (त्याचें जीवपणच नाहींसें झाल्यावर) त्याला ईश्वराच्या आनंदाचा उपभोग कसा घेतां येणार ? म्हणून परमेश्वराच्या जवळ राहून आनंदाची प्राप्ती करून देणारी भक्तीच मला पाहिजे असें उद्धवानें म्हटलें.

७८८. सर्व कर्में परमेश्वरार्पण करावीं.

## प्र० १०६

७९५. तो गोडीनें ब्रह्मविद्येपेक्षांही श्रेष्ठ असतो.

७९८. **आनंदाश्रु** हाच पाठ घ्यावा.

८०५. ब्रह्मयावर व शंकरावरही माझें तितकें प्रेम नाहीं.

८०६. जितकें माझें तुझ्यावर प्रेम आहे तितकें स्वतःवर देखील नाहीं. 'मज आपुला (स्वतःचा) स्नेह (प्रेमा) तैसा नाहीं; जैसा तूं पढियेसि.'

८१०. **द्वंद्व**–सुखदुःख, आशानिराशा इत्यादि.

८११. तो वैराग्यरुपी आसनावर बसतो, व शांभवसुखाचा पायपुसण्याप्रमाणें उपयोग करतो. **अष्टमहासिद्धी:** मागें ६८७ ओवीवरील टीप पहा.

## प्र० १११

८१५ पहा : अप्युद्धव त्वया ब्रह्म सखे समवधारितम् । अपि ते विगतो मोहः शोकश्चासौ मनोभवः (भाग. २९–२९).

८१८–२०. पहा : नैतत्त्वया दाम्भिकाय नास्तिकाय शठाय च
अशुश्रूषोरभक्ताय दुर्विनीताय दीयताम् ॥३०॥
एतैर्दोषैर्विहीनाय ब्रह्मण्याय प्रियाय च
साधवे शुचये ब्रूयात् ॥३१॥ अ. २९.

८२१. माझें ज्ञानछत्र चालविणारा–अनुयायी.

८२३. पहा : गच्छोद्धव मयाऽऽदिष्टो बदर्याख्यं ममाश्रमम् । भा. २९-४१

## प्र० ११२

८२४. **सुक:** शुक; पाराशर व्यासाला शुकीचें रूप धारण केलेल्या घृताची नामक अप्सरेपासून झालेला पुत्र. आजन्म ब्रह्मचारी. परीक्षितीला भागवत यानेंच ऐकविलें



पुढील शब्दकोशांत प्रथम शब्द, मग शब्दाचा अर्थ व नंतर तो शब्द उद्धवगीतेंतील ज्या ज्या ओव्यांतून आला असेल त्या त्या ओव्यांचे आकडे दिले आहेत. इतर ग्रंथांतील उल्लेख निर्दिष्ट करतांना अगोदर ग्रंथाच्या नांवाचा संक्षेप देऊन, त्यापुढें त्या ग्रंथांतील [ असल्यास ] अध्यायाचा व ओवीचा किंवा श्लोकाचा आकडा दिला आहे.

# शब्दकोश व सूचि.

आ

**आंकडा घालणें**–पाशांत गोंवणे. २४५

**आंकणें**–ब्रीद ६५० शि. ८०७

**आखर**– (१) गांवाजवळचा भाग; प्रांत. १०७. शि. ४५३. ऋ. ७१ वच्छ ६७, ६९. (२)अक्षर, वर्ण.२७, ४० ज्ञा. १७-४२.

**आघाओ**–वाटाड्या. ५.

**आगमधर्म**–शास्त्रोक्त धर्माचरण ३६९.

**आगळी**–निराळी,अवर्णनीय.४४९

**आझुई**–अजून. १४७,१४८,१४९

**आझोडणें**–झोडपणें, चोप देऊन पाडणें. १८२, १९५.

**आटणें**–(१) शुद्ध होणें; वितळणें. १७०. (२)अंगाची घडी करून नृत्य करणें; मूर्च्छित करणें. ४५३

**आट**–वळसा. ४६१

**आटा**–गारा. ४०२

**आटि**–यातायात. ५१२

**आटोप**–संकट. ५९

**आढाळ**–हातांत गोळे चाळणें,दोरीवरून चालतांना तोल सांभाळण्यासाठीं हातांत घेतलेला वेळू. टीपा पहा.२३७ ६०१, ६०५.

**आति**–आहे. ८१७. ऋ.१३६.

**आतुडणें**–सांपडणें. ३९, २२३. ज्ञाप्र. ६९६.

**आत्मा**–जीव ५९१, ५९३.

**आधौडि**–आंदोलायमान ४३७

**आनान**–निरनिराळा. ७२८.

**आनौतें**–दुसरीकडे ३८०,ऋ.५६७ ज्ञा. १२-७९

**आपुलेंपण**–आपुलकी, ७९ १३७.

**आपैसा**–आपोआप ३२९ सं.३४, ३८३, ५६७, ५७८. °सेया. ६८४

**आभार**-पालनपोषणाची जबाबदारी, निरवणूक. १०७, १४६.

**आमोद**–सुगंध. ३७.

**आर**–अजगर ३३२, ३३५.

**आरळ**–एक नृत्यप्रकार. ४५७

**आरघा(बा)ई**–उंच सुरानें म्हणावयाचें ललित नांवाचें गाणें; गिरकी घेतांना गीताचा अर्थ सांगणें. ४६१.

**आरोगण**–भोजन १३७ ज्ञा. ११–४२२ °गणें. २२०

**आरोचक**-अरुचि,अनावड.१७६, ८००. शि. ११९.

**आरौति**–अलिकडची. ६३७

**आलीं(लं)बन**–आश्रय, आधार २८६

**आर्त**–इच्छा. ७४४

**आवगत**–धारण केलेलें. ६०१

**आवारु**–भोजन, मेजवानी. ५२, ८२६. °रिब.७०८शि.४५०,१०५९.

**आवीस**–मांस. २५९, ४६९.

**आस्थानी**–सभा. ६४९, ६७७.

**आहाळणें**–भाजणें, ८९ शि.७४७

**आळणें**–आवळणें २३४

**आळाति**–आळविणारा,गायक.४४६ शि. ५१.

**आळिक**–क्षुद्र, क्षुल्लक. ७०

**आळुका**–अडका, पैसा. ७१९

**आळिंबन**– प्रेम, आसक्ति. १९१

**आळें**–झाडाच्या बुंध्याशीं केलेला खोलगट भाग ३, ३६३.

**आळोचणें**–कानांत सांगणें. ६२.

**आंग-उबा**–आंगाच्या उष्णतेनें, घामानें. ३९३.

**आंगतुक**–आंग डोलविणें, ४५२. ज्ञा. १७-२१६.

**आंग-मेळ**–शरीरसंबंध, संभोग. ३५७.

**आंगसीक**–प्रसादवस्त्र. १३२. शि. २३२. ऋ. ४३२

**आंगावरि**–तारण न घेतां. ६३४.

**आंगवण**– (१) सेवा. ७८ °वणें ७१९. (२) शौर्य, सामर्थ्य. २१४, २३९,२६०,४४६,७१६, शि. ८७८ (३) आच्छादन. ५१८.

**आंगवणें**–स्वीकारणें, घेणें. ४९२, आटोपणें, प्राप्त होणें. १६७

**आंदण**–दास्य. नजराणा ३०८.

## इ

**इडा**–एक नाडी. टीपा पहा. १४८

**इंगळी**–विस्तवाची ठिणगी. ६१

**इष्टापूर्त**–यज्ञयागादि श्रौतस्मार्त कर्मे व लोकोपयोगी कृत्यें. ६३९

**ईषण**–अभिलाष, इच्छा. ७१२

**उक**–उकळी, उठावा, झळ. ७०. ज्ञाप्र. ७०७,

**उकटी**–उकाडा. ६१३.

**उकळी**–उक पहा. ७४; पाण्याचा खळाळ. ५५६

**उखरडे**–स्वार. ४३६. शि. ५०४ ९६५.

**उजरणें**–सरळ(ऋजु) करणें ४८५. केका ३७.

**उखेंडी**–अल्प,सहज.१४०शि ४९०

**उगाणा**–हिशेब, व्यवस्था; ऐश्वर्य. १०९ शि. ५७५. ८५५ ज्ञाप्र.८३९ ज्ञा. ११-७१.

**उचका**–उचकाना,तीक्ष्ण कानाचा.९

**उजाळ**–उज्ज्वलपणा. २०६

**उटाळें**- किल्ली. ६८३

**उठवळें**–हकालपट्टी, पराभूत. ४१ ९७. शि. १०६१.

**उठौनि**–उठवून, उठून; ७५.

**उतरणें**–जिंकणें. ५२४

**उत्तरडी**–एकावर एक वस्तु ठेऊन केलेली उभी ओळ, चळथ. १४८

**उत्तरवेठ**–उतारपेठ, माल उतरवण्याची जागा. बाजार१९४,७५६,शि. ६१६. ऋ. ५१

**उत्तरी**–स्नानसंध्यादि करतांना किंवा उत्तरक्रियेच्या वेळीं गळ्यांत बांधण्याचें फडकें, फीत; दोरी. ७७५

उति–उठाव, उद्भव. ७३६

उद्धात–फांकलेला, पसरलेला.६४५

उधळा–मंतरलेली राख; धूळ, धुरळा. ३६२, ३८८, ७३८.

उधार–पतीवर झालेला व्यवहार. १४५

उद्धारे–(१) उसनवारीनें; (२)उद्धार करणारे. ६३४

उन्मेष–स्फूर्ति. १०

उपखणें–नाश पावणें, वाया जाणें. ६२४. ज्ञा. ११–९५

उपखा–उपेक्षा,उणीव३५० ऋ ३४

उपडथवी–भोंवरा.१०४.ऋ.६२५

उपनणें–उत्पन्न होणें. ११६

उपपात्ति–कारणमीमांसा ३०३.

उपरु–श्रेष्ठत्व. ७७५. अमृ २-१६

उपलाण–बिनीचें घोडदळ, टेहळणींचे राउत.४३५. णा. ४४६. णें. १९१. शि. २६९ ५०३, ५११ ज्ञाप्र. ७३७.

उपेणें–वस्ति, मुक्काम. २१४,७०२ शि. ८५८.ऋ.३२० ज्ञा.१८-१७४६

उबाळ–पाण्याचा कढ, उकळी२०३

उमाणें–माप,वजन.६५८शि.६१९

उमाळा–उठावा, श्रेष्ठत्व. ३६२, ४५२, ५५०, ७०७, ७९९

उरंग-रंगहीन,फिकट.१४०वच्छ२९

उरुक–उत्कर्ष, बहर ३१४,७९९

उलींगवाडी–चोरांची वस्ती, चोरी, लुटालूट. १८२,४३४.

उर्ध्द–ऊर्ध्व, श्रेष्ठ. ३४६

उर्णतंतु–लोकरीचा धागा. ४९५

उवेढा–वेढा उकलणें १०५, ज्ञा.११-३८१

उसंग–मांडी. ११६. ऋ. ५.

उसासणें–(१) मोसकणें. ७६, १११, ११४, १९८, ५२५, ७५१, (२) बाहेर पडणें, मोठी होणें, ३२२,

ऊर्णनाभि–कांतीण. ३८२.

## ए

एउता–इकडे. ३८२

एकतळ –एका ताळाचें नांव ४६३

एकदरें–एका दांडीची शिडी;२२५

एकाकिया–एकटा, स्वतंत्र. २७९.

एरु–दुसरा ६३१

## ओ

ओळगाविणें–सेवेसाठीं अर्पण करणें १३०

ओखटें–वाईट, बैर. १२२. टा ४०६

## क

कटकटा– हायहाय. ११४. ज्ञा. ११-३९५

कडलग–शिडी. १६५

कडलेख–शिल्लक असलेले. १७२, ४०७.

कडाड–(१) पर्वताचा कडा. (२) जोर. २०० एभा. ७-५१३, ५२६.

कद्न–कदन्न, हलकें अन्न. २२९

**कदर्या**–कुत्सित व अप्रिय अन्न खाणारा. चिक्कू. ७२०

**कदंब**–समूह ३०

**कबर**–कबरी, वेणी. ३३

**कर्णधार**–सुकाण्या. ५१

**कर्णिका**–कळी ६६६

**कर्णिकार**–पुष्पविशेष. ५५०

**करणचातुर्य**–वशीकरणकौशल्य ५३२

**कल्हार**–अंतःकरण. ४५३

**कवतुक**–कौतुक. ४० तिक. ३२

**कवळणें**–आलिंगण देणें. ७४

**कषाय**–मळ, कृष्णवर्ण. २८३

**कस**–सारभूत अंश; परीक्षा. ३४, ६०८

**कसा**–बंद, बंध. ४४०

**कसणें**–कस लावणें, ५४७

**कसमस**–झळाळी, दीप्ति. ६४६

**कसवटी**–परीक्षा, खरा मार्ग. ६७१ ७७४ ऋ. ६१०

**कहीं**–कधीं. २३३, २७६, २८०, ३३४, ६९२, ८२२.

**कळंजतुकें**–सुढाळ व औट भार वजनाचें ६७४

**कळरव**–मधुर आवाज २३

**कळा**–चातुर्य, २४

**कळास**–बेमालूम जोड २०४

**काट**–थर, लेप, डाग. २८३

**काढणें**–सहन करणें ५१२ ; बाहेर निघणें २०५

**कांडगुंडा**–ज्ञानरूप दगड; बाण. ५२०

**कांतिउ**–कांतून तयार केलेला. २५१

**कापडीक**–यात्रेकरू १०३, ७२२

**कापूरकेळि**–केळींचा एक प्रकार. ३३

**कामतत्त्व**–शृंगार रस ३४, ९९

**कामाठी**–कार्य, कर्मभूमि ८२२.

**कारिसवाणा**–दीन, केविलवाणा १०९

**कासणें**–कमर कसणें, युद्धाला तयार होणें २५, १०७, ४४५

**काला**–मिश्रण. ६८६

**कावल**–फुटकें भांडें १७१

**काळवखा**–काळोख १०२ ज्ञा. १२-४९. ज्ञाप्र. ४६७

**काळवाडि**–टोळधाड. ४६९

**काळास**–कलाकुशलता. ४५९, ४६२

**कांत**–चामडें. ७६०

**कांबी**–छडी, वेत. ३९

**कीरु**–खरोखर, निश्चयपूर्वक. ८३, १६७, १६८ शि. १२४

**कुचिळे**–मलिन वस्त्रें. १९२

**कुट**–कांदाचें पीठ-भुकटी. १४६

**कुटि**–खोटेंपण, दोष. १४४, ६१३

**कुठार**–कुऱ्हाड. १८९

**कुडी**–वाईट, खोटी. २२

**कुपरि**–वाईट संगत; आच्छादन. ६१७ ज्ञाप्र. ५६०

कुमुदबंध्र–चंद्र. ३६, २६६
कुंभिपाक–एक नरक. ५०९
कुरवाळा–कुरवाळण्याची क्रिया, एकमेकांस खाजवणें, ३१९ वच्छ१८६
कुररु–कवडा पक्षी; सपाणा. २६७
कुऱ्हाडा–कुऱ्हाड.१०६
कुल्हार–भांडारगृह. १२५, ६६२
कुसुमायुध–मदन.७६३
कुळाचळ–कुल पर्वत. टीपा पहा. २३१, ५१२
कुळिक–मोडशी, ज्यांत जोराच्या वांत्या व रेच होतात असा आजार. १७६
कें–कोठें. १२६, २७५, ७४४ ऋं. ३२७
केणें–दुकान. ६२५
केव्हाळि–केव्हां ४८९
कैं–केव्हां. २५७
कैवाड–कपट, युक्ति; कैवार. २२८ ४५०
कोडि–कोटि. २९७
कोंडबार–कोंडमार,कुचंबणा.६१४
कोमाये–सुकतो. १७५
कोंभणें–कोंब येणें, पल्लवित होणें. ३, १८, २६३ ज्ञा. ११-२६६
कोरडी–वाळण्याची क्रिया. २०० ज्ञाप्र. ८१९
कोल्हौर–देऊळ. ४२३, ६६२
कोवळीक–कोमलपणा. २६
कोळ–गहाण पडलेला माल ३६४
कौळिक–दृष्टीला भ्रांति पाडणारा एक रोग, दृष्टिबंधन, कपट. ७४६

ख

खटकामुख–एक नृत्यप्रकार, टीपा पहा ४५६
खर्ग–खड्ग. २१८
खळाळ–आवाज करीत वाहणारा पाण्याचा प्रवाह. ११० एभा ७-५२२
खळें–(१) गाभूमि. १५८, २४४ ६९४ (२) स्मशान ११२
खांड-देऊळ–भंगलेलें देऊळ४९३
खांडें–खड्गविशेष. ४५०
खांदवखाल–खांद्यावरील पखाल. ३९६ शि. ३०६, ६१३
खांबाटणें–खांबाला बांधून मग टोचणें. ३६५
खाल–पाल, चामडें.
खुतलें–अंत:प्रविष्ट; वरून दिलेले. ५३१
खुरखुरित–तळमळत, खुरखुर आवाज करीत. ३६३
खुरा–चूर. ६३५
खुली–कोळशाची धूळ ६०२
खुलौरी–रंग, शोभा, खुलावट.९०
खेडें–बाछी ४५०
खेळना–खेळ. १३१
खेवो–क्षणीं ७७०
खेवंग–वर उचलून वळविण्याची क्रिया. ४५१

खोडि–उणीव, दोष. १३८
खेमणें–निष्क्रिय होणें. ९५
खोळ–पिशवी,गवसणी७०७,७३४

ग

गंडा–सीमा, मर्यादा. ६७, ३५९.
गजराउ–गजर, ध्वनि. ६०६
गणचक्र–सैन्याची वावटळ ४२५.
गंधफुलि–सुगंधी कळी ४२३.
गरुडोद्गार–एक रत्न ५१६
गर्भ–मध्यभाग, हृदय. २११
गवसनी (णी)–आच्छादन, खोळ. २९६, ५५३, ७०६
गवांदि–तीळ,हुरडा वगैरेचें मिश्रण; अन्नसत्र १८५
गंवार–गवाळ्या, मूर्ख ३९३
गांगय–भीष्म. ७०९
गावार–गवाळ्या, असंस्कृत ६७४
गाडोरा–पाया.४८९ज्ञा.११-५३२
गाभा–अंतर्भाग, अंतःस्वरूप. २१
गाभेवन–गाभ्यांतील पान. २२०
गावघेणी–गांव ताब्यांत घेणें, बुडवणें ६९
गावघेरी–गांवाला वेढा. १०७
गिरिमा–अत्यंत मोठें होण्याची सिद्धि ६८८
गिंवसणें–ग्रासणें. ३०५
गीतसाळ–गायन शाळा. २२
गुंडा-दगड. ७३० ऋ. १३४
गोमटें–सुंदर ५१९
गोरि–शिकारीच्या वेळचें गायन. ३७० ज्ञाप्र. ७२०
गोसावीणि–श्रेष्ठ. ४२१
गोरुं–ढोर. ३८४

घ

घडा-कुंभ ७३७
घाडिवट–कुंभ ५१०
घटा–समूह २३०
घणवट–धीट, कठिण ७१
घन–निबिड, दाट १२४
घन-सान–चढ उतार.टीपा पहा४६१
घरटी–फेरी, गस्त. ११९
घरडहुळि–मंथन २२२ डोहळि ५३८. ज्ञा. ११-५७६.
घसरें–दाटीनें, वेगानें. ४२५ शि. ३२३.
घागाइलीं–ओरडलीं ३२२.
घाट–काठ, प्रदेश. ४३२
घाटे–चणे; शिखरें, कडे ७३१
घायवारा–मात. १५६ शि.४८३
घारणें–व्यापणें, विष चढून उन्मत्त होणें. ७२, ७७१ ज्ञा. १०-१४२
घालणें–हल्ला, घाला. ४१५, ५२२ शि. २६९
घोनारणें–घोळणें, लोळवणें. १५९ ५०७
घोरंतर–भयंकर. ५१३

च

चतुर्मुख–ब्रह्मदेव ६६९
चढावा–चढाई, हल्ला. २८

**चाणि**—आम्रमोहोर; सुणुक, ५४१
**चर्या** चकवर. टीपा पहा. ४४१
**चळबळ**—चपलता; चंचल. ४५२, ७१४
**चवरें**—बसावयाची जागा; शेवटचें टोक. २२५
**चळोबाळिका**—चपलतेनें. ३१०
**चाउरी**—चौत्रा; चदर. ७०६ शि. ४२९
**चाकवरा**—वावटळीचा भोवरा. गाडीची मळलेली वाट. २०९
**चांग**—चांगलें ४४, ४६
**चाचरी जाणें**—बोबडी वळणें ४४९
**चाड**—अभिलाषा. १६४, २४०, ३१३, ४१४, ४७६, ५२१, ७९९
**चातुर्य**—नैपुण्य, मोहकपणा २५
**चाम**—चामडें ७५८
**चिरणें**—पसरविणें. ३१८,शि १८८
**चुडुफाय**—रागानें दात ओठ खातो १७५
**चुळा**—चूळ भरण्यासाठीं ६५९
**चुळुक**—शिखर. १
**चेवविणें**—जागृत करणें. ५५५
**चैतन्य**—माया ३, ६०१
**चोखट**—चांगलें २८३,५९१. खडें ६५६ क्र ४५७
**चोरखांच**—काकलक मण्याखालील भानेचा खोलगट भाग. ५२१
**चोरथरा**—चोरांचा ठसा, बनावट ६३०, ज्ञाप्र, ५३३, ५८०
**चोरमोळा**—खोटा, बनावट, न चालणारा २४७,६३१.ज्ञाप्र.५३२, ५४९
**चोराकुळ**—चोरांचा समुदाय.१९९
**चोळ**—रंग तयार करण्याचा एक पदर्थ ७९६, ६८६
**चोळाखा**—सांगाडा, शरीराचा मध्य भाग. १४७, १७२
**चौक** चौपदरी मुक्तामाला १२३
**चौकडे**—चारी पायांनीं धावतों ३७१
**चौकी**—चौरंग, काष्ठासन. ५७

छ

**छायामंडळ**—मेघमंडळ २१६

ज

**जगजुग**—आकाश. १०१ शि.६३
**जगबोळ**—नाश ९१, ४५७, शि. ६३, १६४
**जाति**-ललित. ४६२
**जवानिक**—पडदा. ६०४
**जाइली**—पांढऱ्या केसांची ३८४
**जाउपें**-जुळें मूल, लेकरूं ७०४ वच्छ २८२
**जात**—समूह ५, २१०
**जान (ण)**—जाणता, मर्मज्ञ १०, २१, ३५२
**जाणतां**—शाहण्या पुरुषानें. ३०५
**जिगिमिगि**—प्रकाशदीप्ति ६४४
**जिणा**—जिंकलेलें द्रव्य. १३१
**जिनि**—जिवंतपणा, टवटवी ४४

जियाळें–जन्म, जिवंतपण ४०७

जिव्हार–अंत:करण. ८४

जिवाळी–जिव्हाळा ७५४

जीजे–जिवंत राहावें. ४०५

जुझार–योद्धा २४१

जूझ–युद्ध. ६९४

जेंगट–घंटा, ताश ५१० शि. १६९

जैत–विजय २४०

जोहर–अग्नींत प्राणाहुति. १०१

जौळ–समूह १८, ४२५, ६६१

झ

झळाळ–दीप्ति, प्रकाश २९

झळंबणें–फडफडणें. ४४१

झळाळेचीं पातळें–श्वेत वस्त्रें १९२

झांजरणें–जर्जर-धुंद होणें ४३०

झांवळें–अंधुकता २९९ ज्ञाप्र६८२

झिंगीमिंगे–तेज. ३४०

झिंजि–झुंज ४४९

झिळमिळणें–लवलवणें, मूर्च्छित होणें ७४

झीह्लि–भिंगुरटी २६८

ट

टकमक–टवटवी, बहर. ३१०

टांक–नाणें. ५४३, ६३१ ज्ञा. ७-२५ ज्ञाप्र. ५८०

टाकणें–प्राप्त करणें; मिळणें. १६५ १९०, २२५. ऋ. ७, १०५, १०६ ज्ञाप्र. १९६

टाळें–कुलूप. ६८३

टिळक–टिळा. श्रेष्ठ २

टेकुळि–युद्धाचें भांडें, तोफ वगैरे. ४४२

टेव–ठेवण, मांडणी ४३९ ज्ञाप्र. ७३२

ठ

ठीक–मोत्यांचा झुबका. ५१६

ठीकवणी–जोहरी ५३१ ° णिया. ६७४

ठीकाळणें–भेदणें ४४७

ड

डाग–कांठ ६९१

डांडांति–गर्जना करीत १९७ शि. १०५७

डंक–दंश ७६७

डंबाळ–विस्तार, गर्व, औध्दत्य. ८६, ३०७

डीर–अंकुर, पल्लव, ७९८ ऋ. ५५६

डीरैली–अंकुरित झालेली. ७९४

डोंड–पुंड, भुम्या, चोर १९६

डोनि–द्रोणि, होडी ११० ऋ. ४१३ ज्ञाप्र. ९

डोहळा–इच्छा ५९०

डोळेलांस–वशीकरण चिन्ह, दृष्टीबंधन३९, ५३५. शि. १५६ज्ञाप्र. ६३७

ढ

ढाल–अघटित कार्य ५४६

ढिसाळें–समूह ६५७

ढीव–कृत्रिम अलंकार ६०३ ज्ञाप्र. ७४९

धुरा–अग्रभाग, श्रेष्ठ स्थान ७२३
धुमेसाळ–माता ३९६
धुवट- धुतलेले २८३
धुवाठी–धूळ, धुळवड ६७१
धुळिरा–धूळ ४३७
धुळिकोठ–भुइकोट किल्ला. १९४, शि. ४५२
धोंद्वडें–नळकांडी, पिचकारी ४३६

न

नसुधा–नुसता,केवळ७६३ऋ २९९
नळनी–कमलिनी; नायिकेचा एक प्रकार. ६९०
नांगवे–आटोक्यांत येणें शक्य नाहीं २१८
नागोवा–नागवणूक. १९७
नाटि–संरक्षणाचें कार्य ११९
नांदणें–राहण्याचें स्थळ. ३०९. ऋ. २९४
नायका–नायकीण, वेश्या. ४२१
नायकवडी–नाइक ४३४।शि.३४
नावेक–क्षणभर. १८८, २१९
निकरा–समूह, सार. ६७२
निकी–चांगली ४५
निगळ–घरच्या छपरावरील गवत ४२७
निगुती-युक्ति, कौशल्य. ६७६. शि. ३३७
निच–नित्य. २७
निचनपा–नित्य नवा ४२, ७४०, ८०३. ऋ. २५७
निडळ-कपाळ ३२५
निडारु–पूर्ण भरलेला, परिपक्व झालेला. २५२
निढाळ–आश्रयरहितपणा, कमजोरपणा. ८६. एभा. ३-२४३ ज्ञा. १३-१०८
निदसुरा–अर्धवट जागा ५५५
निपोटारें–हीन, कमी प्रतीचें.४८६ ज्ञाप्र. ३४३.
निबळ–निर्बल २०५, २७८
निम्हाळ–जलरहित व छायाशून्य उष्णकाळ ८६. शि.३३, ३९ ऋ ३७
निराश–मर्यादारहित ५८१
निरुता–निश्चित, ७२९ °ती.५०१ °तें ६८१, ७०३
निऱ्हा–अगदीं,पूर्णपणें २२८,२३६ वच्छ. ८२
निलख–निःशेष, पूर्णपणें ४५६, °लेख. शि. ९५३. ज्ञाप्र. ७९४
निलाग–संबंधरहित. २८५
निवटणें–नाहींसें करणें १११
निःश्रेय–मुक्ति २२७
निसाण–एक रणवाद्य. ४४४
निस्तार–सुटका. ५१
निहारु–न्याहळून पाहणें, तटस्थ दृष्टी ३९९
निहाळणें–पाहणें ५४०.

निक्षेप-पुरून ठेवलेलें द्रव्य. ४८३
निर्यास-सार, रस ९९
निर्वाण-शेवट. २११
निर्वाळा-निवाडा. २७३, ६८६.
निर्वाळणें-धुणें,६०१. ज्ञाप्र.५२६
ळलें-निवडक, चांगले. ५०३
निर्वेद-पश्चात्ताप, विरक्ति ३८७ ॠ ३२.
नीडें-जवळ, समोर ३९८
नेट-धडक, भिडणें २१९
नेटेंबोटें-यथातथ्य. ७
नेणता-अज्ञ. ५४
नेपाळें-शांत.८शि.४२७ ज्ञाप्र४९.

प

पंचत्व-मृत्यु १५१
पडप-(१) भूषणवस्त्र, मिरवणु-कीचें वस्त्र, आच्छादन. (२) शोभा. २५, ४२, ९८, ६४४, दानी-देणारा ज्ञा. ११-१२. शि ३७०
पडिखरणें-ओळखणें, दाखवणें ५५४
पढवणें-शिकवणें २३
पढियावो-आवड, प्रीति. ८१ ज्ञा. १२-१७०
पढिये-आवडता-ती-तें. ३२७, ८०४, ८०५, ८२१. वच्छ ४७
येसि. ८०६. शि. २१३.
पढियासणें-मागणें ५५९.५७८, ७००. वच्छ. १७१.
पढिलेंपण-लाडिकपण. ७५३.
पण्यांगना-वेश्या. ३७८.
पताका-(टीपा पहा) ४५५
पतिकरु-पति करावयास आलेला; जबाबदारी. ४७८
पद-(१) चरण. २६, २८. (२) कविता. २९. (३) प्रतिष्ठा. ४६.
पदर-(कवितेचे) चरण २९.
परजणें-हत्यार करणें, छेदणें.८८०
परतणें-तळणें. ३१ शि. ३७४
परतनी-माघार ५२३
परमुख्य-प्रमुख. ६९८
परमौणु-परमाणु. २१०
परतणें-इकडू तिकडे हालवणें, चोळणें. ३२
परिणाम-कार्यकारण वाद. ५८३
परिवस-स्पर्श. ३४३.
परिह (प) सें-ऐक. २७३,३०४
परी-मार्ग, युक्ति, प्रकार. ७२८, ७७७.
पवाड-रिकामपण १४१ ॠ.४६७
पसर-विस्तार. ३८ ज्ञाप्र. ५२३
पासि-पेक्षा. ७९६
पहुड-निद्रा. २१३. शि. ५७६, ॠ. ५४९
पळित-पांढरे केस. ५२१
पहुड-मार्गे १६२. एभा७-२०१
पाख-पंख ३१९, ३४१, ४६८ शि. ५५९.

पेटवण–इंधन ६८
पेठ–बाजार ६३, ५१९ ॠ. ६८
पेठविणें–पाठविणें ७२२
पैशुन्य–दुष्टपणा १८८
पैं–निश्चयदर्शक अव्यय. ४४
पैजा–पण, होड ११८ वच्छ.९२
पैस–सामर्थ्य. ५३५.
पोटाळणें–कवटाळणें आलिंगन देणें २१५, पोटळणें ३९४ज्ञा.११-८५
पोंवणें–ओंवणें ३७४
प्रजन–परदेश. १२८.
प्रतीति–अनुभव, खात्री. २९९, ३०३.
प्रबोध–ज्ञान, जाणीव. ४४.
प्रबंध–काव्यरचना. ३६.
प्रमेय–(१) तत्त्वसिद्धांत २६, २८ (२) छंद, वृत्त २६
प्रह्लाण–ताडं ११५
प्राण प्राणवायु. २७७
प्रेतसाया–प्रेतछाया. २०६

## फ

फडतरैलें–विस्तारलेलें.७००
फणींद्र–शेष. ९
फणिमौळि–सर्पश्रेष्ठ. २६८
फळक–पट्टी. १
फुडा–खरोखर, सहज.१६२,३८१ डें. ६७ शि. १२४
फोडी–फाक; सुपारीचें खांड.१३८

## ब

बखलणें–ढकलणें १३२
बगळाउ–नवसाचा गळ, बगाड. ६०६
बंबाळ–प्रज्वलित,दीप्तिमान.५१६ ५४० शि. ९. ॠ. ४७३
बरग–अवर्षण ४२०
बरव–शोभा. ६०३ ॠ. ७२
बरवंट–सुंदर, देखणा ३९१
बरळ–भ्रांत ६२१, ७५४
बहुतवीणि–पुष्कळ अपत्यें प्रसवणारी ३१४
बहुवस–पुष्कळ ५१७. एभा ९-३२३
बळियां–बळजबरीनें ४१२
बळोवळि–एकसारखें नेटानें२२२ शि. ७२८
बाटी–निर्माल्य-माळ १५७
बाधक–शिपाई; अन्याय. ७२६.
बांधौडि–बंदिवासांत. १९९. ॠ. १६२.
बांधारे–आडवे मोर्चे ४४३
बाप–आश्चर्यदर्शक अव्यय. ३१५
बांबळ–समूह १८, ३९७
बासट–विष ७१
बाहाळि–बहुलता ४७. शि. ३२२
बाह्या–बाहु, भुज. ९१
बाळारथी–बालकें खेळविता. ५
बाळाणेनसी–माडीवर, सज्ज्यांत ३७८. शि. ३४०

## भ



## म

मढ–मट १०६, ५९५. ज्ञा. ११-२९९
मधुवा–मोहोळमासी २६७
महातमा–महानुभाव ४९३
मनकट–मनगट ४५१
महुरु–आंब्याचा मोहोर. ७९५
महुरे–खारक्या नागाचें विष. ७३७
मळयपांचौर–पांच सुगंधाचें वस्त्र १२५, ६६२
मागाडा–माग काढणारा. ४२६
माघौती (तें)–परत, मागें. ५३, ३२१, ३२३ ४६४. ज्ञा. १३-२५७
मात–गोष्ट. १८७
मातावळी–उन्मत्त करणारी ४३३ शि. १५
मादना- आंघोळ १३९ ऋ. ४६९ वच्छ ३०८
मांदाडा–समूह ४२६ ज्ञा.१५-६० एभा. १०-६०९
मांदी–समुदाय १८५
मानवळणें–किल्यावरील पहारेकरी, शैलानें दिलेले वेढे १६१
मानकुल–माणिक ६४५
मारांक–शस्त्र, बाण ४२१ ४४५
मासीं–माझ्याशीं १५५, ३२७, ५०६, ७५२. ऋ. ३४२
महावटी–राजमार्ग ७५५
भिनणें–भेटणें, आसक्त होणें ३२२
मुंचणें–मुक्त होणें, मुकणें ६६४ वच्छ ३९
मुष्टिक–(टीपा पहा) ४५७
मुस्रावणें–मूर्च्छित होणें १७४,७४९
मुळ पाठावणें–बोलावणें. १५, ४२०
मेलह (व) नी–रात्र. १६६
मेलहवन–मालवणें, अस्त ८०, २०७, २४८ शि. १७२
मेहलनी–अंधारी रात्र ३४४ शि. १०५१
मेहुण–बादल, घनच्छाया; मिथुन ३०८
मेळवण–बोळवण, मालवणें १४३
मेल्हिकारु–वसति. ५२
मैळें–वस्त्र ७९६
मोकलणें–सोडणें ११०, ४२६
मोगरसूल–धन, धान्य, अथवा इतर पदार्थांचा समूह, दानधर्म म्हणून जनतेकडून लुटविण्याची क्रिया. ६१९
मोटका–चांगला ४५९, ६५९
मोप–नाणें. १४७, ७५७
मोलकरू–श्रीमंत. ३८१
मोस–मार्ग. ३९, १२०, २२६. शि. ३८५ ज्ञाप्र. ४४७
मोळा–ठसा १७०, ३९५, ५४३.
मृगांक–चंद्र. २
मृगीसुरू–(टीपा पहा) ४५७

य

यक्षकर्दम–एक प्रकारची उटी. ४४०. शि. २८८

यावांका–धैर्य. पुरुषार्थ. ४६०, ६६६. शि. ४२२.

युवन–यौवन. ३७.

र

रंगाखळ–आंगण, वाजंत्री २३७

रजनी–आरसा उलटण्यासाठीं राखेची किंवा इतर द्रव्याची पोटळी. २११

रजस्वला–विटाळशी स्त्री. ५९१

रणभासुर–अत्यंत भयानक.४४४

रति–मदनाची पत्नी २५

रतिराय–मदन. ४४५

रवण–रमणा, अंगण १३१. शि. ५३७. ऋ. ५०६

रस-राय–शृंगार. ९९

रसाळ–(१) आम्रवृक्ष १४ (२) रसिक. ४२९

राओ–राजा. ३८, ४८५

राखोंडी–राख ६०

राणीव–राज्य.४२,४७,४८,८१२ शि. ४६४. ज्ञा. ११-११, १९५;

राणेपण–राजेपणा. १४३

रापणें–रंगणें ७९६. शि ४१३

रारा–एक मंत्र; यंत्र. निंबाची डाहाळी ७७९

रावण–रंगविलेपन २७. शि. १७

राहाटणें–फिरणें २९७

राहाण–दैवत, भगत. ३५. शि. ८१३. ऋ. ४०४

रिगणें–प्रवेश करणें ५२६. °रणी. ५१८, ५५३ शि. ४३६

रिगा (घा) वा–प्रवेश २१२. ऋ. ५०२

रीतहाती–विधवा ९२

रूपक–एका तालाचें नांव. गायन. ४६० शि. ६९८. वच्छ. ३१३

रेखा–रेघ, किरण. १०२

रोकडें–प्रत्यक्ष, तात्काळ ५६. ज्ञा. १२-१७६

ल

लघिमा–अत्यंत हलकें होण्याची सिद्धि ६८८.

लय–तंद्री. ६३७

लळेवडु–लाडकेपण,लाडका.८०९

लक्ष–दृष्टि स्थिर करून ईश्वरस्मरण ६३७

लागि–साठीं. ३६

लाग–(१) लेप, संबंध. ५०८. (२) पाठलाग, लाभ. २४३, ४६७.

लाचाविणें–लाच देऊन वळवणें१५

लाठु–धैर्य. २१९

लाणि–सीमा. ७२०

लांशी–काळा डाग. ५८९

लाहा–आशा, इच्छा. ५१४

लांसि–डांकीण; कोल्ही. १९७

लाहानवाति–गाळीव माती; वाळु. १९३, ४०१.

लेखा–गणती. ४६५

वोतिउ–ओतून तयार केलेला.२५१
वोपर्णे–दान. ६२८, ६६७, ७५३
वोरकल–कसोटीचा दगड. ५४७. ज्ञाप्र. ५८८
वोलांश–ओलेपणा १८४.
वोलां–ओलाव्यानें ३१४
वोल्हावन–ओला लेप. १२, शि. ६२४ °वणें. १७३
वोसि–न्यूनत्व, खिन्नता. ३३४
वोहळ–लवण ५२१
वोहट–उतार.२९४. °टणें,३३७
वोळग–सेवा.१४०. °गणें १५४.
वोळिंबा–वाळवी, मुंगी. ४९०. एभा. ९-१७६.
व्यावृत्ति–निराळेपण, त्याग, खंडन ५७४

## श

शंख–बांगडी ४७९.
शांखळ–शृंखला.३०७.°ळा.४१३
शांभवसुख–ब्रह्मानंद. ७९५. शि. २४२.
शिरीष–पुष्पविशेष. २६
शोखणें–शुष्क होणें ९४.
श्रोणित–रक्त ७६१.

## स

सकट–सहित ३६८.
सगात्र–ठोसर, सघन.५४९,६४५
संगीता–गायनमाधुर्य; गीतनृत्यवाद्य या कला.४२२
सडिवा–भूतसंचार. १८०.
सत्तीस–छत्तीस. ४५३.
सत्वक्ष(क्षे)मु सत्त्वगुणसंपन्न ३३५
सदन–सदन्न, चांगलें अन्न. २७७
संधि–जोड, सांधा. २०४
संन्निधान–सांनिध्य ४९, ५०
संपुट–मिटलेली ओंजळ. १४९
सभावीं–सहजच. ८०
समरस्यें–ऐक्यभावानें ६८२.
समाहार–निरोध. २३३.
सर–स्वर, आवाज. १७२
सरणें–चालणें,उपयोगी पडणें६३०
सरवदा–ज्योतिषी. २४०, ४२८
सराउ–संवय ५३२. शि. ३४१
सरांटी–बाणसमूह४४७.शि.२६७
सरिया–सर, पदर,मालिका ४४१
सरिसा–(१) सारखा ६८० शि. ७७६. (२) बरोबर ७५९.
सवंचोर–हितशत्रु. ५०६. ज्ञा. ३-२११
संवरणें–आवरणें, बांधणें. २१६, ३६१
संवसाया–प्रेतचिन्ह. २०१
सवा–प्रकारानें. २६४
संसार–जग. २२९.
सहसा–एकदम. ३२९.
सळ–(१)छळ.४७४(२)अभिमान. ११७ ऋ २२० ज्ञाप्र. ३२७. ज्ञा. १६-१४३४.

सोमकांत–चंद्रकिरणानीं द्रवणारा पाषाण. १७.

सोरु–डुकर. ३८५, ६२६, ज्ञाप्र. २६७. एभा. १३-१९६

सौरभ्य–सुगंध. २४

सौरस–गोडी, प्रसाद, इच्छा. अभ्यास; धैर्य. ६, ३९, ५३७ अ. १४, १४८.

स्कंद–विभाग ३६, ४१.

स्तबक–गुच्छ. २

स्तवणें–अस्त पावणें ७९, ९८,

स्थानि–सभा. ६७७. शि. ५३.

स्यामा–सुंदर युवती. २६.

ह

हटु–आग्रह; न हटणारा. ३५८.

हडपु–विडा देणारा सेवक. ३८४. शि. ४९. ज्ञा. १७-२७६.

हंबरू–गळफांस. ५९६.

हाउळि–समूह. ५२१, ६३८. ज्ञाप्र. ७३९.

हाडळ–जखीण. ५२१.

हातखोडा–हात अडकविण्याचें लाकडी यंत्र.५११, ५९४.वच्छ.४३३

हात-बोळावन–हातानेंच बोळवणें मार्गाला लावणें ३४९.

हातवसणें–हातांत शस्त्र घेणें. ११८, २४०, ४४५, अमृ. ६-४३. एभा. ७-१५४.

हातसुटी–औदार्य. ७६९. शि. ५८८. ज्ञाप्र. ४५३.

हाथियेर–हत्यार, शस्त्र. ७६, १५०, ३६१, ५२१.ज्ञा. १०-२४०.

हाथोवा–हाताच्या उष्णतेनें. तळहातानें २१७.

हारतपें–हरण करणें; लुटणें. ८७, ९०. ज्ञा. ११-६३७

हाली–हाणितली, मारली. १११.

हिंडी–हिंडणें ( नाम ) ४७६.

हीर–प्रकाश किरण; कीळ. ६४५.

हीरवा–थाव न लागतां ४३९.

हुडा–बुरूज. १९०, ४४२, ४५८, ५९४. ज्ञा. ११-३५८.

हेळसिया–सहज, तुच्छ लेखून, १५७.

होड–पैज. ७७३. शि. ६३९.

ऱ्हद–डोह. २६२

क्ष

क्षेत्र–स्थान; शरीर ३००

क्षेमा–क्षमा ७१६.

ज्ञ

ज्ञानसत्र–ज्ञानाचा यज्ञ. १२३, ८२१.

# स्थळांची सूची.



# व्यक्तींची सूची व माहिती.



**अर्जुन**–६९४ तिसरा पांडव.

**अवधूत**–२४९, २५०, २५३, ४१६, ५२७, ५२८. वस्तुत: हें विशेषनाम नाहीं. पण यदुअवधूत संवादाच्या प्रसिद्धीमुळें त्याचा तसा उपयोग आजकाल करण्यांत येतो. अवधूत=योगी. पहा: यो विलंघ्याश्रमान्वर्णानात्मन्येव स्थित: पुमान्। अतिवर्णाश्रमी योगी अवधूत:स उच्यते ॥

**उग्रसेन**–११३ मथुरेचा यदुवंशीय राजा. याचा पुत्र कंस यानें त्यास कारागृहांत ठेवलें होतें. तेथून श्रीकृष्णानें त्याची सुटका केली.

**उद्धव**–३७, ३८, ५८, ७१, ७६, १५४, २१४, २१९, २३९, २६४, ५३४, ५४४, ५५८, ५९३, ६१८, ६२८, ६४२, ६६७, ६९४, ७०५, ७१७, ७१८, ८१६, ८२३, ८२४. श्रीकृष्णाचा एक परम भक्त. यदुवंशांत जन्मलेला.

**उर्वशी**–७४०, ७४१, ७५१, ७६४. स्वर्गातील एक अप्सरा. ७४१ ओवीवरील टीप पहा.

**ऋष्यशृंग**–४१५, ४१७, ४२०, ४२४, ४३९, ४४६, ४४७, ४६०, ४६२, ४६४, ४६५. विभांडक ऋषीचा पुत्र. ४१५ व्या ओवीवरील टीप पहा. मृगीसुत. ४३८ व हरिणीसुत. ४५६ हे शब्द यालाच उद्देशून वापरले आहेत. दशरथाच्या शांता नामक कन्येशीं त्याचा विवाह झाल्याचें भवभूतीनें उत्तररामचरित्रांत वर्णिलें आहे.

**कुन्ती**–११६, १२०, १२१ पंडु राजाची राणी. पांडवांची माता, वसुदेवाची बहीण व म्हणून कृष्णाची आत्या.

**कुबेर**–७१९ पुलस्त्य ऋषीचा पुत्र विश्रवस् याला देववर्णिनी नामक भार्येपासून झालेला पुत्र. रावणाचा सावत्र भाऊ ( अ. रा. उत्तरकांड सर्ग १२ ) हा देवाचा भांडारी आहे असें मानतात.

**कृष्ण**–७, ८१८, ८२४ वसुदेव व देवकी यांचा पुत्र. हरी ६९७, श्रीचक्रपाणी ६५, १२८, ५४१ व श्रीचक्रधर ११८, १३४, ६२०, ७०९, ८२३, हे शब्द श्रीकृष्णाला उद्देशूनच वापरलेले आहेत.

**गांगेय**–७०९. गंगापुत्र भीष्म. देवव्रत, ७११, हें भीष्माचेंच दुसरें नांव.

**चक्रधर**–३. महानुभावपंथ-संस्थापक. पूर्वाश्रमीचें नांव हरिपाळदेव.

भडोच येथील विशालदेव नामक प्रधानाला माल्हण देवीपासून झालेला पुत्र. ( जन्म शके ११1६ ) वयाच्या २६ व्या वर्षी हरिपाळदेव मेल्यावर त्याच्या शरीरांत द्वारावतीकार श्रीचक्रपाणीनें प्रवेश केला. पुढें त्यास लौकरच विरक्ति उत्पन्न होऊन तो रामटेकच्या यात्रेच्या मिषानें ऋद्धिपूर येथें गेला. श्रीगोविंदप्रभुला आपले गुरु केलें. त्यांनींच त्याला चक्रधर हें नांव ठेविलें. शके ११९० मध्यें संन्यास घेतल्यावर कांहीं वर्षे आपल्या तत्त्वांचा लोकांस उपदेश करून तो लौकरच बद्रिकेदारकडे निघून गेला.

**दशरथ**–४२०. रघुकुलोत्पन्न अजाला इंदुमतीपासून झालेला पुत्र. रामाचा पिता.

**दत्तात्रय**–१. अत्रि-अनसूयानंदन.

**देवकी**–११४. श्रीकृष्णाची माता, उग्रसेनाची मुलगी.

**देवव्रत**–७११. वर 'गांगेय' पहा.

**द्रौपदी**–११९. द्रुपद राजाची कन्या. पांडवांची धर्मपत्नी. श्रीकृष्णाची मानलेली बहीण.

**धर्मराज**–११७. ज्येष्ठ पांडव, युधिष्ठिर ७०९ हें याचेंच नांव आहे.

**नागदेव**–१, ४, ६, २३९, ५४०, ७०९, ८२३, श्रीचक्रधराचा प्रमुख शिष्य व महानुभावपंथाचा खरा प्रसारक. जन्म शक(सांप्रदायिक) ११५८. मृत्यू १२२४. वडिलांचें नांव माधवभट व आईचें नांव आबाइसा. यास सारंगपाणी व वैजोबा नांवाचे भाऊ व उमाइसा नांवाची सर्वांत धाकटी बहीण होती. नागदेव आपल्या पूर्वायुष्यांत स्वैराचारी होता परंतु चक्रधराच्या दर्शनानें व अनेक भेटींनीं त्याच्या आयुष्यांत क्रांति घडून आली. वयाच्या ३२ व्या वर्षी त्यानें चक्रधराचें शिष्यत्व पत्करलें. पंथांत तो आचार्य या पदवीनें ओळखला जातो. ग्रंथरचना कांहीं नाहीं.

**नारायण**–३३८.

**नंद**–११५. गवळी, यशोदापति; कृष्णाचा पालक पिता.

**पात्रकलिका**–४२१,४३९,४४९ ४६० ऋष्यशृंगाकडे पाठवलेली नायकीण.

**पार्थ**–११८. अर्जुन. पहा.

**पिंगळा**-२६७, ३७६, ३८८, ४१३. मिथिला नगरींतील एक वेश्या.

**पुरंधर**–६९७ इंद्र.

**पुरुरवा**–७४०,७६५ ओवी ७४० वरील टीप पहा.

**ब्रह्मा**–६६, १३२, ६३३, ६४४, ६६८, ६७१, ६७६. ६९७, ८०५.

**भास्कर**–६, ५०४, ८२७. या ग्रंथाचा कर्ता. महानुभाव पंथांतील